


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



अंक ३९२ जानेवारी-फ्रे-मार्च
अंक ३९३ - एप्रिल-मे-जून
अंक ३९४ - जुलै - ऑगस्ट-सप्टेंबर
अंक ३९५ - ऑक्टोबर-नोव्हें-डिसेंबर

जानेवारी डिसेंबर २००५

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१२

जानेवारी-फेब्रुवारी-मार्च २००५

अनुक्रमणिका

# ८० जी प्रमाणपत्र

म. सा. परिषदेस देणगी देणाऱ्यांना आयकर खात्याकडून '८० जी प्रमाणपत्र' प्राप्त व्हावे म्हणून गेल्या दोन वर्षांपासून परिषदेचे प्रयत्न चालू होते. कळविण्यात आनंद होतो की, हे ८० जी प्रमाणपत्र परिषदेस नुकतेच प्राप्त झाले असून त्याची मूळ प्रत येथे प्रसिद्ध करीत आहोत. देणगीदारांना या प्रमाणपत्राचा निश्चितच उपयोग होईल. परिषदेच्या हितचिंतकांनी परिषदेस अर्थसाहाय्य करून कार्यकर्त्यांना प्रोत्साहित करावे, अशी विनंती आहे. इ. स. २००५-२००६ हे परिषदेचे शताब्दी वर्ष आहे. त्यासाठी विविध योजना व उपक्रम पार पाडण्यासाठी परिषदेतर्फे निधी उभारला जात आहे. सर्वांनी या निधीस सढळ हाताने मदत करावी, अशी विनंती आहे. आता पावतीच्या मागील बाजूस हे ८० जी प्रमाणपत्र मुद्रित करून घेतले जात असल्यामुळे वेगळ्या प्रमाणपत्राची गरज पडणार नाही. १०० वर्षांची वाटचाल पूर्ण करणाऱ्या या संस्थेस नवे-जुने सभासद, हितचिंतक व देणगीदार यांनी आर्थिक साहाय्य करावे, तसे आपल्या परिचितांनाही त्याबद्दल सांगावे, अशी नम्र विनंती. परिषदेस हे ८० जी प्रमाणपत्र प्राप्त होण्यासाठी मदत करणाऱ्या आयकर विभागातील संबंधित अधिकाऱ्यांची परिषद आभारी आहे.

सोबत : ८० जी प्रमाणपत्राची मूळ प्रत

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
कार्याध्यक्ष, म. सा. प.

**No. Pn/T-I/80G/R 121/131 /2002-2003**

Donations made to Maharashtra Sahitya Parishad, Tilak Road, Pune– 4110 30., will be eligible for the benefit of deduction u/s 80G of the income-tax Act, 1961, in the hands of the donors subject to the limits and condition prescribed therein.

2. The exemption granted to the above Trust is valid from 1.4.2000 to 31.03.2005 subject to adherance of following :

1. Receipts iss}d to the donors should bear the Ref. No. and date of this order.

2. The return of income accompanied by Statement of Accounts and Income & Expenditure Account, Balance sheet of the ibid Trust/Society to be submitted to the concerned Accessing Officer as per the specified d} date laid fown in the Income Tax Act.

3. If further renewal is required an application in Form No. 10 G should be made to this Office by ibid trust/Society alongwith the statements of accounts for the last 3 years alongwith the copies of acknoledgements of returns of income, and Certificate u/s 13(1) (c) of the I.T. Act, 1961, signed by the Trustees alongwith list of donors of amount of Rs. 500/- & above for the last 3 years.

Sd/-
(S.K. Jha)
Commissioner of Income Tax-I, Pune

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१२
जानेवारी-फेब्रुवारी-मार्च २००५



संपादक
**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**



**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी (०२०) २४४७५९६३

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**मुद्रक-प्रकाशक :** रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ :** स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

**अक्षरजुळणी :** एच. एम. टाइपसेटर्स, ११२०, सदाशिव पेठ, निंबाळकर तालीम चौक, पुणे ४११०३०.

**किंमत रु. १५/-**

**प्रकाशन दिनांक :** मार्च २००५

(या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमी सहमत असेलच, असे नाही.)

# संपादकीय

सदानंद देशमुख यांच्या 'बारोमास' या शेतकऱ्यांच्या व्यथा मांडणाऱ्या कादंबरीला लाभलेला यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार, नारायण सुर्वे यांना 'जनस्थान पुरस्कारा'चा मिळालेला यथायोग्य मान, रंगभूमीच्या सेवेची ५० वर्षे वैभवशाली कारकीर्द गाजविणारे प्रभाकर पणशीकर यांचा झालेला हृद्य गौरव, बँक ऑफ महाराष्ट्रचे महा-सरव्यवस्थापक व राज्यभाषा-अधिकारी डॉ. दामोदर खडसे यांना मिळालेला महाराष्ट्र राज्य साहित्य अकादमीचा हिंदी साहित्यातील योगदानाबद्दल 'गजानन मुक्तिबोध पुरस्कार', सत्तराव्या वर्षात पदार्पण करणारे बालसाहित्यातील एक समृद्ध नाव- लीलाताई दीक्षित या सर्वांचे अभिनंदन.

माजी पंतप्रधान आणि साहित्यिक कै. पी. व्ही. नरसिंहराव, कवितेचा संसार अर्ध्यावर सोडून गेलेले कवी निरंजन उजगरे, ज्येष्ठ संगीत-समीक्षक, शास्त्रीय संगीताचे जाणकार आणि साहित्य चळवळीतील एक उल्लेखनीय व्यक्तिमत्त्व प्रा. श्रीराम पुजारी, नाटककार प्रदीप दळवी, कथालेखक व.कृ. जोशी, ज्येष्ठ कवी देवकीनंदन सारस्वत या सर्वांना परिषदेतर्फे श्रद्धांजली.

त्सुनामीच्या महासंहारक लाटा, जीवघेणी हिमवृष्टी, मृत्यूचा उच्चांक गाठणारे रेल्वे अपघात, मांढरदेवीच्या जत्रेतील चेंगराचेंगरीतील असंख्य बळी आणि नुकताच ५.१ रिश्टर स्केलचा पश्चिम महाराष्ट्राला हादरवून मृत्यूच्या जिभल्यांचे ओझरते दर्शन घडविणारा भूकंप... एक ना दोन, असे अनेक उत्पात मनाला बेचैन करणारे आहेत. या उत्पातातील बळींना श्रद्धांजली. प्रतिभावंतांनाही या घटना आवाहक ठराव्यात.

वास्तवाची दखल घेणारे 'बारोमास', शेतकऱ्यांच्या आत्महत्येवर 'टाहो' फोडणारा कवी इंद्रजित भालेराव, थोरामोठ्या 'नापास मुलांची गोष्ट' सांगून परीक्षेच्या धास्तीने जीवन संपविणाऱ्या विद्यार्थ्यांना दिलासा देणारे पुस्तक संपादणारे कवी अरुण शेवते, 'मी पण-माझे' हे अनोखे आत्मचरित्र लिहिणारे श्री. राजेन्द्र बनहट्टी ही या तीन महिन्यांतील उल्लेखनीय साहित्यकृतींची नावे आहेत.

ग्रंथ परिचय/ग्रंथ परीक्षण यांना सध्या दिले जाते त्यापेक्षा अधिक स्थान पत्रिकेत देण्याचा प्रयत्न आहे. त्यासाठी मर्मज्ञ समीक्षकांच्या सहकार्याची अपेक्षा आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शताब्दी महोत्सवाचा प्रारंभ २७ मे २००५ रोजी होत आहे. सध्याची वास्तू अपुरी आणि गैरसोयीची असल्याने त्या जागी नवी वैभवशाली वास्तू उभारण्याचे स्वप्न साकार करण्यासाठी काही कोटींच्या घरात खर्च येणार आहे. सर्व साहित्यप्रेमींनी- निदान सभासदांनी प्रत्येकी रु १०००/- दिले तर हा स्वप्नपूर्तीसाठी आवश्यक निधी जमा होऊ शकेल.

या वर्षीचे विभागीय मराठी साहित्य संमेलन ह. मो. मराठे यांच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले. कोकणात खेड (जि. रत्नागिरी) येथे हे संमेलन भरविण्यासाठी श्रीमती प्रतिभा लिमये आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी खूप परिश्रम घेऊन ते देखणे केले, त्यांचे अभिनंदन!



अनुक्रमणिका







नाशिकचे ७८ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन साहित्य रसिकांना तृप्त करून गेले. अहमदनगरला जागतिक मराठी साहित्य संमेलन अपेक्षेप्रमाणे नीटनेटके नि उद्‌बोधक झाले. याबद्दल संमेलनाचे आयोजक अनुक्रमे डॉ. वसंतराव पवार, श्री. किशोर पाठक आ. यशवंतराव गडाख, श्री. रामदास फुटाणे इत्यादींचे हार्दिक अभिनंदन.

या अंकातील लेखांवर प्रतिक्रिया याव्यात हीही अपेक्षा आहे. प्रतिक्रियांचे स्वरूप अर्थातच साहित्य पत्रिकेला साजेसे विचार देणारे असावे. तो साहित्य संवाद असावा.

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**
७, गायकवाड कॉलनी, सांवेडी रोड, अहमदनगर
संपादक

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
**१९०५-२००६**
**शंभर वर्षांची वाटचाल**

सप्रेम नमस्कार

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ही साहित्यविषयक कार्य करणारी महाराष्ट्रातील आद्य संस्था आहे. (स्थापना : २७ मे १९०६) या संस्थेची स्थापना लो. टिळकांच्या प्रेरणेने व त्यांच्या उपस्थितीत झाली. गेली ९८ वर्षे ही संस्था सातत्याने कार्य करीत असून संस्थेचे सभासद महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर सर्वत्र पसरलेले आहेत. काही सभासद परदेशातही आहेत. या संस्थेची सभासद संख्या ७५०० पेक्षा अधिक असून या संख्येत सतत भर पडत आहे. अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाची स्थापना (१९६१) होईपर्यंत म. सा. परिषद हीच सर्व मराठी साहित्यप्रेमींचे प्रतिनिधित्व व नेतृत्व करणारी संस्था होती. १९६४ पर्यंत याच संस्थेतर्फे वार्षिक मराठी साहित्य संमेलन भरवले जात होते.

आज संस्थेचे कार्यक्षेत्र १४ जिल्ह्यांपुरते सीमित असले तरी संस्थेच्या कार्याचा विस्तार सतत चालू आहे. म. सा. परिषदेच्या ३५ पेक्षा अधिक शाखा असून त्या मुख्यत: ग्रामीण भागात आहेत. काही शाखा आदिवासी भागातही आहेत. नवनव्या ठिकाणांहून शाखा स्थापन करण्याबाबत नव्या पिढीतील साहित्यप्रेमींकडून मागणी होत असते.

**संस्थेचे आजवरचे कार्य बहुविध स्वरूपाचे आहे.**

* अभ्यासकांना व संशोधकांना नित्य मार्गदर्शक ठरतील असे अनेक संदर्भ ग्रंथ म. सा. परिषदेने प्रकाशित केले आहेत. त्यात 'मराठी वाङ्‌मयाचा इतिहास' (६ खंड, प्रारंभापासून १९५० अखेर), 'भाषा व साहित्य : संशोधन' (खंड ३) 'भाषा अंत:सूत्र आणि व्यवहार' हे प्रमुख आहेत. विशेष उल्लेखनीय बाब म्हणजे अमराठी वाचकांना आधुनिक मराठी साहित्याची परिपूर्ण ओळख व्हावी यासाठी A History of Modern Marathi Literature Vol. I & II हा ग्रंथ प्रकाशित करून म. सा. परिषदेने एक मोठी उणीव दूर केली आहे.

* प्रथमा, प्रवेश, प्राज्ञ व विशारद या मराठीच्या परीक्षा गेली ६० वर्षे घेतल्या जात











असून या परीक्षांचा लाभ महाराष्ट्र, गुजरात, मध्य प्रदेश, गोवा, कर्नाटक येथील विद्यार्थ्यांना होत असतो.

* 'संदर्भ ग्रंथालय' हाही परिषदेचा महत्त्वाचा उपक्रम असून ५० हजारांपेक्षा अधिक ग्रंथ व नियतकालिके अभ्यासकांना येथे उपलब्ध आहेत. आज या ग्रंथालयाचे १६०० सभासद असून विविध ठिकाणांचे अभ्यासक मोठ्या प्रमाणात या ग्रंथालयाचा उपयोग करून घेत असतात.

* संस्थेचे 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' हे त्रैमासिक मुखपत्र गेल्या ८० वर्षांपासून प्रकाशित होत असून मुख्यत: वैचारिक व समीक्षात्मक लेखनासाठी ते प्रसिद्ध आहे. मराठीतील आघाडीच्या सर्व विचारवंतांनी म. सा. पत्रिकेसाठी लेखन केले आहे.

* ग्रंथ पारितोषिक हेही परिषदेचे अभिमानास्पद कार्य आहे. कथा, कविता, कादंबरी, नाटक, आत्मचरित्र, इतिहास, कोश, बालवाङ्मय, विनोद आणि वैचारिक साहित्य इत्यादी विभागांसाठी ही पारितोषिके आहेतच; त्याशिवाय तत्त्वज्ञान, संगीत-समीक्षा, अनुवाद, विज्ञान साहित्य, कृषिविषयक लेखन, उपयुक्त कला, संशोधन अशा क्षेत्रांत उल्लेखनीय साहित्यनिर्मिती केलेल्या लेखकांचा 'ग्रंथकार पुरस्कार' देऊन गौरव केला जातो. परिषदेच्या या विभागाचे काम वर्षभर चालू असते.

* विभागीय संमेलन, स्मृतिदिन, कविसंमेलन, चर्चा, शाखा मेळावा यांसारखे कार्यक्रमही नित्यनेमाने घेतले जात असतात. दलित साहित्य परिषद, मराठी अभ्यास परिषद, पुणे विद्यापीठाचा मराठी विभाग आणि विविध कविमंडळे यांच्या सहकार्यानेही काही कार्यक्रमांचे आयोजन केले जाते.

* पुण्याबाहेरील लेखकांसाठी व निमंत्रितांसाठी परिषदेचा अतिथी निवास असून अनेक साहित्यभक्तांची या अतिथी-निवासामुळे मोठी सोय झाली आहे.

* निराधार, गरजू साहित्यिकांना आर्थिक साहाय्य हेही म. सा. परिषदेचे एक संस्मरणीय कार्य आहे. असे साहाय्य मिळावे म्हणून अर्जही करावा लागत नाही. दरमहा ठराविक रक्कम संबंधित लेखकाला बँकेमार्फत आयुष्यभर दिली जात असते. **या प्रकारे निराधार साहित्यिकांची कदर करणारी म. सा. परिषद ही महाराष्ट्रातील एकमेव साहित्यसंस्था आहे.**

२००५-२००६ हे परिषदेचे शताब्दी वर्ष आहे. या निमित्ताने परिषदेच्या कार्यकर्त्यांनी अनेक योजनांचा संकल्प केला आहे.

परिषदेची आजची वास्तू अत्यंत अपुरी असून आधुनिक काळाला अनुसरून नवीन इमारत उभी करणे ही परिषदेची अत्यंत निकडीची बाब आहे. यासाठी मोठ्या प्रमाणावर निधी उभा करावा लागणार आहे. परिषदेच्या कार्याबद्दल आस्था असणाऱ्या साहित्यप्रेमींच्या औदार्याच्या बळावर हे मोठे काम उभे राहील, असा सर्व कार्यकर्त्यांना विश्वास वाटतो.

या महत्त्वाकांक्षी शताब्दी प्रकल्पासाठी आपण स्वत:, तसेच आपल्या संस्थेच्या वतीने जास्तीतजास्त अर्थसाहाय्य करून शताब्दी-निधी सिद्ध करण्यास मदत करावी अशी विनंती आहे.

**रवीन्द्र भट**
प्रमुख कार्यवाह

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## सन १९०६-२००६

| शताब्दी वर्षातील संकल्पित प्रकल्प | खर्च अंदाजे |
|---|---|
| ❖ वास्तुनिर्माण | रु. २ कोटी |
| ❖ संगणकीकरण / वेबसाईट | रु. २५ लाख |
| ❖ साहित्यिक साहाय्य निधी | रु. ५० लाख |
| ❖ अक्षरसाहित्य योजना | रु. १ कोटी ५० लाख |
| ❖ ग्रंथालय नूतनीकरण | रु. २५ लाख |
| ❖ संदर्भ ग्रंथ मायक्रोफिल्मिंग | रु. २५ लाख |
| ❖ मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७, ८ | रु. १० लाख |
| ❖ मराठी वाङ्मयाचा इतिहास : हिन्दी | रु. १० लाख |
| ❖ शाखानिहाय ग्रंथालये (४५ शाखा) | रु. ९० लाख |
| ❖ मराठीतील साहित्यकृतींचे इतर भाषांत अनुवाद | रु. २५ लाख |
| ❖ केशवसुत स्मृतिशताब्दी कविसंमेलने, चर्चासत्रे इ. | रु. १० लाख |
| ❖ व्यवस्थापन सुविधा | रु. २५ लाख |
| ❖ परीक्षा विभागाचा विकास | रु. १५ लाख |
| ❖ संशोधन व प्रकाशन विभाग | रु. ४० लाख |
| **एकूण** | **रु. ७ कोटी** |

*या संकल्पित प्रकल्पासाठी जास्तीतजास्त देणगी देऊन मराठी भाषेच्या वैभवात अधिकाधिक भर घालण्यासाठी आपण हातभार लावावा, अशी सर्व हितचिंतकांना, साहित्यप्रेमींना आणि सभासदांना विनंती आहे. आपली देणगी 'महाराष्ट्र साहित्य परिषद' या नावाने धनादेशाद्वारे पाठवावी. या देणगीसाठी ८० G ची सुविधा उपलब्ध आहे.*

**श्री. रत्नाकर कुलकर्णी**
(कोषाध्यक्ष, म. सा. प.)

# तंजावरच्या कोरीव लेखांतील समाजदर्शन



**डॉ. माणिक धनपलवार**

तंजावरला मराठ्यांची राजसत्ता दीडशे वर्षांपेक्षाही अधिक काळ होती. या कालखंडात व्यंकोजीपासून (इ.स.१६७६ ते १६८४) शिवाजीपर्यंत (इ.स. १८३२-५५) अनेक राजे होऊन गेले. त्यांच्या कार्यकाळात तंजावर प्रांतात अनेक शिलालेख व ताम्रपट लिहिले गेले. हे कोरीव लेख तमिळ, मराठी, संस्कृत आदि भाषांतून आहेत. तेथील प्रादेशिक भाषा तमिळ असल्यामुळे त्या भाषेत सर्वाधिक लेख असणे स्वाभाविक आहे. त्या खालोखाल मराठीतून लिहिलेले लेख आढळून येतात. या लेखात इतिहासाच्या दृष्टीने कुठल्याही घटनाप्रसंगांना स्थान नसले, तरी तंजावरचा समाज व संस्कृती जाणून घेण्यासाठी ते उपकारक ठरणारे आहेत. इतिहासाच्या दृष्टीने एखाद्या-दुसऱ्या घटनेचा उल्लेख तेवढा आढळतो (शिलालेख ८९-९०).

तंजावरच्या कोरीव लेखांचे दोन खंड उपलब्ध आहेत. पहिला खंड "Fifty copper plates of the marathas of Tanjavur" हा असून त्याचे संपादन डॉ. वाय सुब्बरायलु यांनी केले आहे, तर दुसरा खंड "Inscriptions of the Marathas of Tanjavur" हा असून ते पुलवर एस. राजू यांनी संपादित केले आहे. हे दोन्ही प्राध्यापक तंजावरच्या तमिळ विद्यापीठाच्या एपिग्राफी या विभागातील असून या विद्यापीठानेच हे दोन्ही ग्रंथ अनुक्रमे इ. स. १९८३ व १९८७ मध्ये प्रसिद्ध केले आहेत. पहिल्या खंडात ३३ तमिळ, १० मराठी (मोडी लिपीत), २ मराठी (देवनागरी) व संस्कृत ५ असे ताम्रपट आहेत, तर दुसऱ्या खंडात एकूण १२४ शिलालेख असून त्याच्या जोडीस तमिळमधील दहा ताम्रपट आहेत. १२४ लेखांपैकी मराठीतील लेख २४ आहेत. काही लेख दोन, तीन, चार, पाच भाषांतून असून मजकूर एकच आहे.

प्रस्तुत लेख या दोन ग्रंथांवर आधारित आहे. विषयाच्या प्रतिपादनासाठी मराठीबरोबर तमिळ लेखही विचारात घेतले आहेत.

यातील जवळपास सर्व लेख मंदिरात कोरलेले वा मंदिराशी संबंधित आहेत. महाराष्ट्राची संस्कृती व तमिळ संस्कृती यांत बरीच भिन्नता आहे. जे देव महाराष्ट्रात फारसे नाहीत, ते तिकडे विराजमान आहेत. त्यांची निर्मिती दक्षिणेकडील असल्यामुळे त्यांना तमिळ नावे प्राप्त झाली आहेत. याशिवाय प्रचलित असलेल्या अनेक देवदेवतांना त्यांनी विविध प्रकारे संबोधल्यामुळे

ती ती नावे त्यांना प्राप्त झाली आहेत. तसेच तमिळ जीवनसरणी, भक्तिसंप्रदाय आणि तिकडील अनेक पूजोपचार हे महाराष्ट्राला बरेच अपरिचित; तसेच गावांची व स्थळांची नावे मराठी उच्चारपद्धतीत न बसणारी. त्यामुळे त्या कोरीव लेखांचे स्वरूप महाराष्ट्रापेक्षा एकदम वेगळे वाटते. तमिळ भाषास्वरूपाचाही त्या लेखांवर प्रभाव पडलेला आहे. त्यांच्या उच्चापद्धतीमुळे मराठी नावे वेगळी लिहिली जातात व वाचली जातात. 'गाढे' ऐवजी 'काडे', 'मोहिते' ऐवजी 'मोकिते', 'दादाजी' ऐवजी 'ताताजी' असे लेखन आढळते. शिवाय आपण व्यक्तिनामापुढे आदरार्थी 'राव' हा प्रत्यय लावतो तर तमिळ भाषिकांनी नावाला बाजूला सारून आडनावापुढे 'राव' हा प्रत्यय जोडला. या संबंधात 'शिर्केराव', 'महाडिकराव', 'सावंतराव' अशी काही उदाहरणे देता येतील.

दक्षिणेकडील संस्कृती ही फार मोठ्या प्रमाणात पुराणांवर पोसलेली आहे. मंदिरे हा त्यांच्या जीवनविषयक श्रद्धांचा अविभाज्य भाग आहे. यामुळे मंदिरांची स्थापना मोठ्या प्रमाणावर झाली. त्यातील दैवतांवर आधारित अनेक स्थलपुराणेही निर्माण झाली. प्रस्तुत खंडांतून अनेकानेक मंदिरांची नावे आली आहेत. वरदराज, राजगोपालस्वामी, एल्लैयमन, शंकरनारायण, लोकनाथेश्वर, सुब्रह्मण्यम्, कामाख्या, तंजापुरीश्वर, आनंदवल्ली, मरियम्मन् (मरिआई), मीनाद्छी (मीनाक्षी), मुरुगन, त्यागराज, आदिवराहस्वामी अशी कितीतरी मंदिरे तंजावर प्रांतात विराजमान आहेत. तंजावर प्रांत हा मंदिरांनी अगदी गच्च भरला आहे. तमिळ भाषिकांप्रमाणे मराठी लोकही या दैवतांना भजतात. राजांनी व प्रजेनी आपल्या कष्टातून व दानधर्मातून ह्या मंदिरांची जोपासना इतिहासकाळापासून केली आहे.

**लेखांची माध्यमे :** शिलालेख हे मंदिरांच्या भिंतींवर, खांबांवर, पायरीवर, फरशीवर वा एखाद्या शेतात दगड रोवून त्यावर कोरलेले आढळतात. लाकडी तुळईवर काही लेख कोरलेले आहेत. काही ठिकाणी दगडी खांबावर प्रतापसिंह, मल्लारजी गाढेराव (मोकाशी) आदींच्या स्वतंत्रपणे मूर्ती कोरलेल्या असून त्याखाली मजकूर दिलेला आहे.

ताम्रपट म्हणजे तांब्याच्या पत्र्यावर कोरलेला लेख. तांब्याबरोबर पितळेचाही लेखासाठी वापर केला आहे. काही लेख चांदीच्या पत्र्यावर, चांदीच्या कलशावर वा ताटावर आढळून येतात. सुवर्णपदकावरही दानलेख लिहिलेला आढळतो. श्रीरंगम्च्या रंगनाथ मंदिराला भेट दिलेल्या सोन्याच्या पदकावर सर्फोजींचे (२रा) नाव कोरलेले आहे. एवढेच नव्हे तर मदुराईच्या मीनाक्षी मंदिराला इ.स. १८१७ मध्ये दान दिलेल्या मौल्यवान 'नागापर्णम्' रत्नावरही सर्फोजींचे नाव आहे. तंजावरकडील कलाकुसरीचे प्रतिबिंब अनेक ताम्रपत्रांवर दिसून येते. बहुतेक ताम्रपत्रांवर देवदेवीच्या आकृती रेखीवपणे कोरलेल्या आहेत. कलात्मकतेच्या दृष्टीने कुंभकोणम्च्या नागेश्वर मंदिरातील एक ताम्रपत्र पाहण्यासारखे आहे. त्या पत्रावर चाळीस प्रकारच्या वाद्यांची चित्रे कोरलेली आहेत. त्याच्या मागील बाजूस दात्यांचा तपशील आहे. (५-४-१७३४). तंजावरने स्वत:ची एक खास चित्रशैली निर्माण केली होती. "The Tanjore Paintings of the Maratha period" हे जया अप्पासामी यांचे पुस्तक या

दृष्टीने लक्षात घेण्यासारखे आहे. शिल्पकला, मूर्तिकला या दृष्टीनेही हा परिसर प्रसिद्ध होता. समर्थ रामदासांच्या इच्छेनुसार येथून राम-सीतेच्या धातूच्या मूर्ती सज्जनगडला पाठविण्यात आल्या होत्या.

**दानाचे विषय :** बहुतेक कोरीव लेख हे मंदिरांना कुठल्या ना कुठल्या रूपाने दिलेल्या दानांवर आधारित आहेत. राजांनी तशीच राजघराण्यातील स्त्रियांनी मंदिरांना पैशाबरोबर भेटवस्तूही दिल्या. राज्याच्या महसुलातील विशिष्ट भाग काही मंदिरांना दानाच्या रूपात देण्यात येई. काही नगरातून व्यापारी स्वत:च्या मिळकतीतून थोडा भाग नियमितपणे मंदिरास देत. तशा प्रकारचे लिखित कागदपत्रही होते. मंदिरात संगीताच्या वा विविध वाद्यांच्या माध्यमाने सेवा करणारे लोक आपल्या उत्पन्नातून विशिष्ट भाग मंदिराला नियमितपणे कायमस्वरूपी देत. तशा ठरावावर सह्या केल्याचेही ताम्रपत्रावरून आढळून येते. राजाप्रमाणे प्रजेनेही मंदिराच्या योगक्षेमासाठी मोठ्या प्रमाणात हातभार लावलेला दिसून येतो. मंदिरांचा खर्चही थोडाथोडका नसे. काही मंदिरांचा सेवकवर्ग पाचशे माणसांपर्यंत जाऊन भिडे. मंदिरांच्या आश्रयाने देवदासी राहत. त्या उत्सवप्रसंगी नृत्य, गायन करीत. राजांनी नृत्य-गायनासाठी, यक्षगानासाठी 'नर्तनशाळा' बांधल्याचा उल्लेख काही लेखांतून आला आहे. राजाकडून मंदिरात यज्ञयाग होत. काही मंदिरांतून राजघराण्यातील स्त्रीने एक लक्ष पणत्या लावल्याचे एका ताम्रपटात आले आहे. संगीत, नृत्य, नाटके व अन्य धार्मिक कार्ये यांसाठी मंदिरे ही केंद्रस्थानी होती. मंदिराकरिता फुलांच्या राखीव बागाही ठेवाव्या लागत. या सर्वांवर होणारा खर्च राजांच्या देणगीवर वा मंदिरांना मिळणाऱ्या उत्पन्नावर चालत असे.

मंदिरांना दान देण्याव्यतिरिक्त प्रजेच्या व्यावहारिक कल्याणाकडेही राजांनी लक्ष पुरविले. शेतीकरिता नदीतून कालवे खोदविले. तुळजाराजाने १७७१ मध्ये कुडमुरुत्ति नदीचा प्रवाह बदलून शेतीला भरपूर पाणी मिळवून देण्याची व्यवस्था केली. राजांनी गरिबांकरिता व ब्राह्मणांकरिता ठिकठिकाणी अन्नछत्रे उघडली. विद्वान पंडितांना अग्रहारे दिली. राजांनी दानांच्या बाबतीत शैव-वैष्णव असा भेद केला नाही. दक्षिणेकडील अशा विचारप्रवृत्तीपासून राजे अलिप्त होते. तिरुवारूरचे शिवदैवत तंजावरच्या भोसले राजांचे कुलदैवत होते. राजा प्रतापसिंह शैव असूनही रामभक्त होता. त्याचे गुरूही रामदासी संप्रदायातील होते. अन्य मंदिरांप्रमाणे राममंदिरासाठीही राजांनी देणगी दिल्याचे उल्लेख आले आहेत.

**पूर्वकालीन लेख :** या दोन्ही ग्रंथांतील लेख तंजावरच्या मराठ्यांच्या कार्यकाळातील असले तरी त्यास एक- दोन अपवादही आढळतात. १२२ चा शिलालेख १६ मार्च १६६५ चा आहे. त्यावेळी तंजावर प्रदेश मराठ्यांच्या ताब्यात नव्हता. शाहजीचा पुत्र व्यंकोजी बंगलोरची जहागीर पाहत असताना त्याच्या राज्यातील काही अधिकाऱ्यांनी व्यंकोजीच्या पुण्यप्राप्तीस्तव उत्तर अर्काट जिल्ह्यात 'पेरुमाल पालैयम्' या नावाने एक वस्ती वसविली. यावरून एखाद्या प्रदेशावरील अधिकार किती लवचिक राहत असे याची कल्पना येते. अर्थात येथे शासन करण्याचा प्रश्न नव्हता.

असाच एक ताम्रपट तंजावरपूर्व शासनकाळातील उपलब्ध आहे. हा ताम्रपट काचिमठम् (तिरुप्पन आंडाळ) येथील आहे. हा ताम्रपट मराठीत असल्याचे संपादकाने म्हटले आहे, पण तो तसा नाही. यात संस्कृत मजकुराने बराच भाग व्यापला असून त्याखाली हिंदी पोटभाषेत थोडासा मजकूर आला आहे. १८ जानेवारी १६५४ च्या या ताम्रपत्रातील दाता मराठी भाषिक वाटतो. वीरजी शाहू याचा नातू शाहूजी याने देवनाथपुरम् येथे जमीन खरेदी करून चौदा घरे बांधली व त्यातील एक घर प्रभाकर द्विवेदी शर्मा यांस दान दिले. प्रभाकर द्विवेदी हा कुणा विठ्ठल द्विवेदीचा नातू होय.

या दोन्ही लेखांतून मराठी माणसांचा दक्षिणेकडील विविध प्रदेशांतील प्रवेश बराच जुना असावा अशी अटकळ बांधता येते. तसे पाहिले तर कृष्णदेवरायाच्या काळापासून मराठी माणसांचा दक्षिणेकडे ओघ होता. कृष्णदेवरायाचा एक अधिकारी महाराष्ट्रीय होता. असे प्रसिद्ध इतिहासकार रावसाहेब सी. हयवदनराव लिहितात. पोर्तुगीजांच्या धार्मिक छळामुळेही १६ व्या शतकात अनेक मंडळी गोव्याहून व कोकणातून प.श्चिम किनारपट्टीने खाली कारवार, कोचिनपर्यंत जाऊन पोहोचली.

**लेख विठ्ठलावरचा :** अनेकांचा असा समज आहे की, तंजावर प्रदेशात रामदासी संप्रदायाचा प्रसार, विस्तार झाला पण विठ्ठल दैवत व विठ्ठलभक्ती मात्र तिथपर्यंत पोहचली नाही. तिकडे विठ्ठलभक्तीचा प्रवाह खूप क्षीण आहे हे खरे; पण त्याला कारणेही तशीच आहेत. व्यंकोजी राजाबरोबर तंजावरला गेलेली माणसे ही महाराष्ट्रीय असली तरी कन्नड संस्कृती प्रभावित होती. प्रत्यक्ष महाराष्ट्राच्या भूमीवरून तंजावरकडे गेलेली माणसे कमीच. जी गेली ती रामदासी संप्रदायी; यामुळे असे झालेले दिसते. तरी पण विठ्ठल संप्रदाय तंजावर परिसरात होता हे कुणालाही नाकारता येत नाही. तंजावर, कुंभकोणम् येथे विठ्ठलमंदिरे आहेत व ती तंजावरकडील मराठी माणसांनीच बांधली आहेत. इ.स. १८१९ च्या शिलालेखात तंजावरच्या 'विठोबा' मंदिरातील 'भजनसभा' सर्फोजी' (२रा) यांनी बांधल्याचा उल्लेख आहे. तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात 'ज्ञानेश्वरी'च्या प्रती, तुकारामांची व अन्य वारकरी संतांची अभंगरचना आढळून येते. ही सर्व अभंगरचना घरगुती वह्यांतून विखुरलेली असून त्या वह्या सरस्वती महालात उपलब्ध आहेत. याचा अर्थ तंजावरला गेलेली अनेक मराठी कुटुंबे विठ्ठलास भजत. तंजावर व त्याच्या परिसरातील पुदुकोट्टाई आदि गावांतून विठ्ठलभक्तिपर रचना करणारे काही कवीही होऊन गेले. तंजावरकर सुब्बराव कृत 'पंढरपूरच्या यात्रेची लावणी', तसेच तंजावरचा गंगाराम व पुदुकोट्टाई येथील अंबुबाई यांचीही विठ्ठलपर रचना आहे. मराठीच्या प्रभावाने तमिळ भाषेतही अभंगरचना निर्माण झाली व तशी काही रचनाही प्रकाशित झाली आहे. पण डॉ. द. दि. पुंडे म्हणतात, त्याप्रमाणे वारकरी पंथ हा रामदासी पंथासारखा फोफावला नाही किंवा त्या पंथात कुठलेही कवी वा त्यांचे साहित्य निर्माण झालेले दिसत नाही. तंजावरचे राजे व तेथील मराठावर्ग शिवभक्त, शिक्षित, विद्वान, ब्राह्मणवर्ग बराचसा मध्वसंप्रदायी, यामुळेही असे घडले असावे.

**संभाजीचे मंदिर-निर्माणाचे कार्य :** शिवाजीचे पुत्र संभाजी यांनी दक्षिणेकडे काही कामगिरी बजावली हे इतिहासात कुठेही आलेले दिसत नाही. इ.स. १६८३ च्या शिलालेखात एकोजीचा पुतण्या व शिवाजीचा पुत्र संभाजी याच्या आज्ञेने गोपाळ पंडितरायन या सुभेदाराने बिदउर येथील ८०० कुळी जमीन पाळयनगोट्टै येथील विश्वनाथ मंदिराला दान दिली. (क्र. ११९) असे आले आहे.

यापेक्षाही महत्त्वाची कामगिरी चिदंबरम् येथील नटराज मंदिरातील शिलालेखात निर्देशिली आहे. इ.स. १६८५ मध्ये शाहजीचा नातू व शिवाजीचा पुत्र संभाजी याच्या कार्यकाळात गोपाळ दादाजी पंडित याने चिदंबरमूला 'शिवगंगा' ही पुष्करिणी बांधून शिवमंदिर उभारले.

या शिलालेखांव्यतिरिक्त ताम्रपत्रांतून यापेक्षाही मोठ्या कामगिरीचा गौरव आला आहे. हे ताम्रपट संस्कृत व तमिळमध्ये असून 'तिरुवारूर ताम्रपट' या नावाने ते ओळखले जातात. या चार ताम्रपटांना ग्रंथात ४५ ते ४८ असे क्रमांक दिले आहेत.

**क्र. ४५ :** चिदंबर मंदिरातील जी नटराजाची मूर्ती इ.स. १६४८ मध्ये तेथून सुरक्षित स्थळी नेण्यात आली होती, ती संभाजीच्या आज्ञेने गोपाळ दादाजीने परत आणून तिची पूर्वीच्या जागी १६८४ मध्ये स्थापना केली, असे यात दिले आहे. याची १६८९ मध्ये प्राणप्रतिष्ठा झाली.

**क्र. ४६ :** हा ताम्रपट वरच्या ताम्रपटाशी संबंधित असून संभाजीने मंदिराचा जीर्णोद्धार केला आणि मंदिराला सोन्याचा पत्रा बसविला. या ताम्रपटातील पुढचा मजकूर तमिळ पद्यात असून जी मूर्ती २४ डिसेंबर १६४८ मध्ये नेऊन कुटुमियामलै येथे गुप्तरूपाने ४० महिन्यांपर्यंत ठेवली होती, ती पुंढे मदुराई येथे नेण्यात आली. तेथून ती मूर्ती १४ नोव्हेंबर १६८६ मध्ये मूळ स्थानी परत आणली गेली.

**क्र. ४७ :** मुत्तैय्या दीक्षितार याने कुंभाभिषेक करून नटराजाचे स्तवन केले. यात शेवटी आलेल्या तमिळ पदात तिरुचिर्रम्पलट्टवमुनिवर याने २१-११-१६८४ रोजी जलाभिषेक केला, असे आले आहे.

**क्र. ४८ :** चिदंबरम्च्या मंदिरात नटराजाचा दोन वेळा अभिषेक झाल्याचे लिहिले आहे. पहिला अभिषेक २१-११-१६८४ व दुसरा अभिषेक १४-११-१६८६ रोजी. या लेखाच्या शेवटी गोपाळ दादाजीने संभाजीच्या संमतीने मंदिराचा जीर्णोद्धार केला, असे म्हटले आहे.

यावरून संभाजीच्या दक्षिणेकडील कार्यकर्तृत्वावर प्रकाश पडतो. यासंबंधीचे थोडे अधिक विवेचन "दाक्षिणात्य साहित्य संस्कृतीचा मराठीशी अनुबंध" या माझ्या ग्रंथात आले आहे. (पृ. २८२-२८५)

**कोंकणेश्वर मंदिर :** यानंतर ताम्रपटांवरील तीन लेख आपल्या दृष्टीने महत्त्वाचे ठरतात. हे तीन लेख, ११, १२, २१ असे कोंकणेश्वर मंदिराशी संबंधित आहेत. पहिला व दुसरा म्हणजे ११ चा व १२ चा लेख १७३५ चा असून तिसरा म्हणजे २१ चा लेख



अनुक्रमणिका

१७५८ चा आहे. व्यापाऱ्यांनी आयात केलेल्या मालावरील विशिष्ट जकात तंजावरच्या या मंदिराला देण्याचा तपशील त्यात आला आहे. कोंकणेश्वर या मंदिरातील प्रमुख देव 'कोंकणेश्वर' असून त्याच्या जोडीस ज्ञान अंबिकाई आणि अन्नपूर्णश्वरी या देवता आहेत. कोकणातील रहिवाशांचा कोंकणेश्वर म्हणजे 'शिव' हा प्रधान देव होय. तंजावरला जे मराठी भाषिक स्थलांतरित होऊन आले, त्यात कोंकणचे रहिवाशीही होते असे यावरून दिसते. कोंकणेश्वर हे दैवतनाम व्यक्तिनाम म्हणूनही तंजावर प्रांतात रूढ होते.

तंजावरला महाराष्ट्रातून तसेच बंगलोर, विजापूर व त्या परिसरातून मराठी लोकांचे आगमन झाले, पण कोकणातूनही लोक कसे काय आले, असा प्रश्न येथे उद्भवतो. राजाश्रयासाठी वा व्यापारासाठी कुठलेही लोक येऊ शकतात व कुठेही जाऊ शकतात. पण कोकणातील लोक सरळ तंजावरला आले असतील असे वाटत नाही. हे लोक कारवार, कोचीन या भागांतून आले असण्याची दाट शक्यता आहे. कर्नाटकाप्रमाणे तमिळनाडूचा त्रावणकोरशीही जवळचा संबंध होता. महाराष्ट्र व मराठीचाही दक्षिणेकडे केरळपर्यंत संचार होता. पोर्तुगीजांच्या काळात अनेक सारस्वत व अन्य मंडळी गोव्याहून, कोकणातून कोचीनपर्यंत पसरली होती. त्रिवेंद्रमला तंजावरची मराठी हस्तलिखिते गेली. कारवारला 'दमयंती-स्वयंवरा'ची एक प्रत मिळाली. 'दमयंती स्वयंवरा'त काही कोंकणी शब्दांचा आढळ आहे. (हे शब्द अन्य कवींनीही वापरले आहेत असा प्रतिवाद करण्यात आला.) तंजावरच्या भाषेतील कोंकणी शब्दांच्या अस्तित्वाविषयी विशेष विचार व्हायला हवा. 'मिरशेंगा' हा मिरचीकरिता वापरात असलेला शब्द मात्र तेलगु, कन्नड, तमिळ यांच्या प्रभावाला दाद न देता तंजावरी मराठीत तसाच टिकून आहे. 'तंजावरी भाषेचा मराठी कोश' यातही 'मिरशंगा' (तिखट तांबट फळ) या शब्दाचा समावेश आहे. हा शब्द मात्र निखालसपणे कोंकणी आहे. (पहा : काही चित्पावनी शब्द, महाराष्ट्र शब्दकोश भाग ५ वा, पृ.४२) नाटकातील 'विदूषका' करिता 'कोडंगी' हा शब्द कन्नड (आणि मल्याळम?) भाषांत रूढ असून तो तंजावरच्या साहित्यात 'कोणगी' या रूपात आला आहे. 'कुणवी' साठी 'कुळवाडी' हा शब्द कोकणात रूढ असून 'कुळवाडी लोक' व 'कुळवाडी भाषा' यांचा उल्लेख तंजावरच्या ग्रंथातून येतो. हा शब्द मराठवाडा व विदर्भ यांना ज्ञात नाही. यावरून तंजावरला मूळ कोकणचे रहिवाशी असलेले लोक आले, या वस्तुस्थितीवर येथे प्रकाश पडतो. दक्षिण कोकणावर कन्नडचा प्रभाव विशेषत्वाने जाणवणारा आहे. तंजावरचे साहित्य व भाषा यांचा विचार करताना हा घटक सूक्ष्म वाटला तरी तो अत्यंत महत्त्वाचा ठरण्याची शक्यता आहे. तंजावरच्या काही ग्रंथांचे ते लेखकही असू शकतात. रघुनाथ पंडित हा यांपैकीच असण्याची शक्यता आहे.

प्रस्तुत लेखात मराठी अभ्यासकांच्या दृष्टीने जे लेख महत्त्वाचे वाटले त्यांचाच विचार के आहे. शिलालेख व ताम्रपट मूळ स्वरूपात पाहिले तरच अनेक गोष्टींचा उलगडा होऊ शक ग्रंथात सर्व लेखांचे ठसे दिलेले आहेत. ते सर्वच स्पष्ट आहेत असे नाही. तसेच लेख म ीत असो की तमिळमध्ये, त्यांची संहिता मात्र तमिळमध्येच दिली आहे. ही या

ग्रंथातली आपल्या दृष्टीने फार मोठी उणीव होय. मराठीतील कोरीव संहिता जशाच्या तशा व तमिळ संहिता मराठी अनुवादासहित दिल्यास मराठी अभ्यासकांची फार मोठी सोय होईल. (या दोन्ही खंडांच्या प्रस्तावना व प्रत्येक लेखाचा सारांश इंग्रजीत आहे. कोरीव लेखांतील आशय समजावून घेण्यास तो उपकारक ठरतो.) लेखातील बारीकसारीक तपशील यामुळे आपल्या अवलोकनाच्या कक्षेत येईल. सध्या तरी मराठी जीवनाला अभिव्यक्त करणारी अशी परभाषेतील साधने आपल्यापासून थोडी दूरच आहेत. असे म्हटल्यास चुकीचे ठरू नये.

**डॉ. माणिक धनपलवार**

(माजी मराठी-विभागप्रमुख, उस्मानिया विद्यापीठ)

३-४-१०१३/१९ बरकतपुरा, हैदराबाद ५०००२७

दूरभाष– (०४०) ७५६१२८४



---

## साभार पोच

**ग्रंथोपजीविये :** मधु जामकर, भूमिका प्रकाशन, चिंचवड, पृष्ठे १२०
**अष्टागर (चंदेरी हिरवाईचे) :** मधुसूदन फाटक, ग्रंथाली ज्ञान-यज्ञ, मुंबई, पृष्ठे ७०
**मनाचे मनोगत :** साधना कामत, ग्रंथाली ज्ञान-यज्ञ, मुंबई, पृष्ठे ७६
**सदानंद (सुखी माणसाचा सदरा) :** डॉ. सुरेश नाडकर्णी, ग्रंथाली ज्ञान-यज्ञ, मुंबई, पृष्ठे ८४
**परिव्राजक :** गौतमीपुत्र कांबळे, एक्सप्रेशन पब्लिशिंग हाऊस, कोल्हापूर, पृष्ठे १७६
**झुंबर :** प्रकाश नारायण संत, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १५२
**शाळा :** मिलिंद बोकील, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ३०४
**बाप लेकी :** संपादित, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ४१८
**अस्तित्ववाद आणि मराठी कादंबरी :** रेखा इनामदार-साने, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३२
**कादंबरी दोन :** विजय तेंडुलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३८
**असंही :** प्रिया तेंडुलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४६
**स्फूर्तिकण :** देवबा पाटील, नभ प्रकाशन, अमरावती, पृष्ठे ६०
**शब्दांजली :** नरेंद्र बाळकृष्ण कुलकर्णी, शब्दांजली प्रकाशन, कराड, पृष्ठे ३२
**धुमसणारे किनारे :** नितीन पाटील, चार्वाक प्रकाशन, विरार, पृष्ठे १२८
**माठी-मिठी :** सूर्यकांत जाधव, शारदा प्रकाशन, ठाणे, पृष्ठे ८०
**भूप :** मोनिका गजेंद्रगडकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई, पृष्ठे १५२
**त्याचं नांव होतं कार्व्हर :** सौ. लीला शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ५२
**कथा शास्त्रज्ञांच्या :** सौ. लीला शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ५८

# 'प्रदेश'च्या निमित्ताने
## वसंत आबाजी डहाके



**प्रा. एम. पी. पाटील**

वसंत आबाजी डहाके यांच्या 'शुभवर्तमान' मधील 'प्रदेश' ही एक कविता. त्यामधील कवितागत 'मी' स्वत:शी आणि संबंधित 'तिच्याशी' सात मुक्तछंदीय खंडांतून संवाद साधत असतो. या सात खंडांच्या 'प्रदेशा' तून फिरत असताना प्रामुख्याने दोन भाववृत्तींचे भावन भिडत असते.

'योगभ्रष्ट' पासून 'शुन:शेप' पर्यंतच्या डहाके यांच्या बहुसंख्य कवितांतून आत्महीनतेच्या जाणिवेने प्रतिबद्ध झालेल्या न-नायकाचे दर्शन घडविणारा या पृथ्वीवरील 'प्रदेशा' तील जो उपरा (outsider) आहे तो या कवितेत आहेच. मानवी जीवनातील अर्थशून्यता, परात्मता, एकाकीपणा याबद्दलची चीड, संताप, अगतिकता, उपरेपणाची (non-belonging) ची भावना हे सर्व या कवितेत भावतेच. या पृथ्वीप्रदेशातील माणसाच्या संदर्भातले हे असले नकारात्मक 'अस्तित्व' या कवितेत आहेच. डहाके यांच्यावर असलेला उपरोक्त प्रकारचा प्रभाव या कवितेत जाणवतोच.

या अर्थशून्य असहाय अस्तित्वातून सुटण्यासाठीचे संबंधित 'तिला' केलेले आवाहन हे या कवितेचे उत्कट भाववृत्तीचे दुसरे अंग आहे. या अगतिक प्रेतवत् अर्थशून्यतेतून सुटण्याचा पर्याय म्हणून केलेले हे आवाहन आहे.

पहिला व तिसऱ्या खंडाचा काही भाग आणि दोन, चार, पाच हे संपूर्ण खंड यांमध्ये 'उपरा'च्या भाववृत्तीचा आविष्कार आहे आणि पहिल्या व तिसऱ्या खंडांचा उर्वरित भाग व शेवटचे सहा, सात हे दोन खंड यांमध्ये संबंधित भाववृत्तीतून सुटण्यासाठीचा पर्याय म्हणून विचार करताना होत असलेली घालमेल आणि मुक्तताशोधक आवाहन आहे.

प्रथम आपण या कवितेतील या 'प्रदेशा'तील उपरा बघू :

'मन त्रासलेलं. पोळलेलं कुत्रं जसं/ इथं लोळतं, तिथं लोळतं/ तसा मी/' अस्वस्थ मूडमधील उपराच्या हीनत्ववाचक अभिव्यक्तीला साजेसं, जणू एक अडीच ओळीचं लयबद्ध गद्यवाक्य आणि एकदम डोक्यात जळत असलेल्या शहरानं पेट घेतल्यानं भावोत्कटतेचा

विरोधी लय साधत येणारा आकांत–

*मी धावत असतो आकांतानं*
*पेट घेतलेल्या अस्तित्वासह*
*तापलेल्या रस्त्यांवरून*

अस्वस्थ उदास मूडमधून एकदम तडफडत कळसाला जाणाऱ्या भाववृत्तीचा विस्फोट.

..... परत उदास, असहाय्य, वैफल्यग्रस्त मूड–

येथे काही घडावं– काही 'व्हावं' ही आंतरिक इच्छा. पण काहीच घडत नाही. एक शून्यवत पोकळी. जीवनदार्या पाणीच वाळूत जिरून जावं, तशी 'होण्या'च्या शक्यतांची झालेली गत. काही घडण्याच्या– 'होण्या'च्या शक्यतांच्या इच्छांची झालेली प्रेतं... ती सडत चाललेली.

शक्यता कसल्या, तर विरोधी लय साधीत येणाऱ्या नकाराच्या. वाईट घडण्याच्या, अशुभ घडण्याच्या. काचेने हात चिरत जावा, तशा चिरत जाणाऱ्या आयुष्याच्या.

नुसतं साहतो, सडलेल्या इच्छांची प्रेते वाहतो, अशा लयआंदोलित भाषेतून आवर्तित होणारी असहाय्य अगतिकता.

..... तिसऱ्या खंडात तीच उदासी उत्कट होत गेलेली.

सगळंच ओरबाडून टाकलं जातंय. मन छिन्नविछिन्न. इच्छांच्या धांदोट्या. झाडं पिळवटलेली, जमीन जळालेली. मस्तकातून वाहणारा भणभण वारा ओसाडीचा.

सारंच, सहनशक्तीच्या पलीकडलं.

.... चवथ्या खंडात जवळजवळ सारंच संपल्याची आणि आयुष्याची माती माती झाल्याची जाण. 'काही घडवीन' यावरचा, स्वतःबद्दलचा विश्वास राहिला नसल्याने काहीच विशेष न घडता आयुष्य हातातून निसटून जात आहे. म्हणून स्वतःच्या विनाशाकडे समजुतदारपणे व शांतपणे चालत जायचं, याखेरीजचा पर्याय हाती राहात नाही अशी व्यक्त होत असलेली निराधारपणाची भाववृत्ती.

..... आणि पाचव्या खंडात व्यक्त होते अस्तित्वशून्यतेची बधिरता. आपल्या खांद्याला चिकटलेला आपलाच हात आपल्याला सापडत नाही, अशी मेंदूची बधिरता.

*मला हात नव्हतेच की काय, कुणास ठाऊक.*
*काय होतं काय नव्हतं,*
*समजेनासं झालंय.*

अशी ही अस्तित्वशून्यतेचा प्रत्यय देणारी बधिरता.

–उपरोक्त कविताखंडांतून कधी त्रासिक, कधी उदास, कधी विफल, कधी असहाय, कधी अगतिक कधी निराधार अशा विविध भाववृत्तींच्या ताणांतून जाणारा या 'प्रदेश' मधील 'उपरा' जणू संज्ञाशून्य अवस्थेत अस्तित्वशून्य बधिरतेप्रत पोहोचतो आहे.

डहाके यांच्या अनेक कवितांतून हा काळोखाचा राजपुत्र Prince Of Hell-Outsider, आपल्याला अनेकदा भेटलेला आहे आणि भेटत असतो.

पण 'प्रदेश' या कवितेत पहिल्या खंडापासून अख़ेरच्या खंडापर्यंत आलेले जे मुक्तशोधक आवाहन आहे, ते या कवितेचे अधोरेखित व्हावे असे वैशिष्ट्य आहे.

उपरोक्त अस्तित्वशून्यवत् बधिरतेशी सामना करण्यासाठी, तिच्यातून मुक्त होण्यासाठी, तिच्यातून सुटका होण्यासाठी, माणसापुढे काही पर्याय येऊ शकतात. आध्यात्मिक अशा ईशसत्तेची सहायार्थ आराधना, विद्रोही बंडखोरी, चिरसुंदर निसर्गाशी समरसता, प्रियतमेशी रममाणता, जीवनोत्सुक सृजनशक्तीशी क्रीडा अशा काही पर्यायांचा या संदर्भात विचार होऊ शकतो.

या पर्यायांपैकी क्रमाने काहींचा विचार करून, 'प्रदेश' मध्ये अभिप्रेत असलेल्या पर्यायांकडे वळू.

१) ईशसत्तेची सहायार्थ आराधना– ही गोष्ट अस्तित्ववादी प्रभावाने रद्दबातल केली आहे. 'God is dead' हे अस्तित्ववादी घोषवाक्य आहे. ईश्वराचे अस्तित्व नाकारून येथे मानवी शक्तीकडे अंगुलिनिर्देश केला आहे. मानवी कर्तृत्वाला येथे सर्वस्व मानले आहे.

डहाके यांच्या कवितेतील (वा त्यांच्यातील) हा 'उपरा' ईश्वरी अस्तित्वाला सतत नकार देत आला आहे. 'ईश्वराचा खून केव्हाच झाला आहे', हे त्याने जाहीर केले आहे. त्यामुळे ईश्वराबद्दल तो बिनधास्त उपहासाचे फराटे ओढत असतो.

*....पांढऱ्या आकाशाखाली मी ईश्वरनिंदा करतो*
*....ईश्वर हा एक प्रचंड कीटक आहे.*
*...जगाचा कर्ता भयंकर प्रेतकळा आलेला*
*...ती अदृश्य शक्ती*
*आपल्यासाठी तरी बहिरी आहे आणि मुकीही आहे*
*डोळे असतील, पण त्या डोळ्यांना दिसत असेल काही*
*शंका आहे,*
*...क्षुद्र असलाच तर तो स्वत: (ईश्वर) कीटक नव्हे*
*...पण कसं पकडावं आपल्या हातात*
*हे शतक, या शतकातलं देवाचं प्रेत*
*...तू ईश्वराचं तोंडी लावणं आहेस*
*कालवण आहेस*

२) ईश्वरी आराधनेचा पर्याय बाद केल्यावर उरलेले तीन पर्याय, मानवी कर्तृत्वाच्या आवाक्यातील असतात. अस्तित्ववादी भूमिकेने मानवी कर्तृत्वाला सर्वस्व बहाल केले आहे. ईश्वराला पर्याय म्हणजे स्वत:च सृजनशील प्रतिईश्वर व्हायचे.

'देवाचे अस्तित्व नसलेल्या या जगात माणूसच प्रत्येक गोष्टीला जबाबदार असतो...

माणूस म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून तो स्वतःच जे घडवितो, 'होतो' (become) तेच असतो... अस्तित्व म्हणजे उच्च विकासासाठी झटत असलेले, माणसाचे जिवंत व्यक्तिमत्त्व... मानवी अस्तित्व हे शक्तिसंपन्न असते. ते अनेक संभाव्यतेतून निवड करीत असते. आपण 'आपण' आहोत, याची जाणीव या निवडीतून होत असते. आपण एक वस्तू नसून, आपण निवड करणारे, त्यानुसार 'होण्या'साठी कृती करणारे– धडपड करणारे व्यक्तिमत्त्व आहोत, यातूनच आपल्याला आत्मप्रतिष्ठा प्राप्त होणार आहे, याचे त्याला आत्मभान असते.'

अशा या अस्तित्ववादी भूमिकेचा उपरावर प्रभाव पडत असतो. योगभ्रष्टता, अर्थशून्यता, परात्मता अस्तित्वशून्यवत् बधिरता आदींवर मात करण्यासाठी, त्यांच्यातून मुक्त होण्यासाठी तो मानवी आवाक्यात येणाऱ्या पर्यायांची निवड करण्याची शक्यता असते.

त्यांचा आता विचार करावयाचा.

**(अ) विद्रोही बंडखोरी–**

असहाय्य करणारे, संताप आणणारे, अटळ विनाशकारी, अर्थशून्य जे काही आहे, ते बदलण्यासाठी करावयाची बंडखोरी हा एक त्यावर मात करण्यासाठीचा, मुक्त होण्यासाठीचा पर्याय आहे.

डहाके यांचा 'उपरा' हा पर्याय निवडू शकतो का?

'मी आव्हान देणारा हंगामी योद्धा' असे म्हणताना 'हंगामी' या शब्दातून ही बंडखोरी झेपणे त्याला शक्य नसते, हेच दिसून येते. तो कबुलीच देतो–

***मी त्यांच्याच आसपास कुठेतरी बावळटासारखा हाताळतो***
***सामान्य लोकांमधला कोवळा विद्रोह***
***तरीपण,***

'मदांध राज्यकर्त्यांच्या पाशवी वासना, नरमेधांमध्ये बंडखोरांच्या रक्ताने न्हायलेले रस्ते, या शतकाच्या ज्वलंत शोकनाट्याने गोठलेले आक्रोश आणि आनंद, विश्वाच्या प्रत्येक चौरस्त्यावर नररक्त पिऊन नग्न नाचणारे सैतानाचे अनौरस पुत्र'– या सर्वांमागील जी समाजरचना आहे ती नष्ट करण्यासाठी, सामान्य माणसातील विद्रोहाला आवाहन केले जाते–

***हे लाकूड तोडणाऱ्या, पॉलिश करणाऱ्या***
***रिक्षा चालवणाऱ्या, अत्यंत सामान्य माणसा,***
***जागृत होऊदे तुझ्या अंतःकरणातील वादळांचे समुद्र***

या संदर्भातील एक तिरकस उपरोधक शेराही पाहण्यासारखा–

समजा या अर्थशून्य प्रदेशातील ही प्रेतवत्- 'डेड' झालेली– बाग, आनंदकंद मुलांनी फुलवली; आणि हे कळताच त्या कुठल्या सत्तेने फर्मान काढले की ही सार्वजनिक बाग उद्ध्वस्त करून टाका आणि त्यानुसार तसे केले गेले तर–

*उद्ध्वस्त बागेकडे पाहात*
*मुलं हसताहेत*
*बंदूकवाल्या शिपायांकडे पहात*
*मुलं हसताहेत*
*मुलं भयंकर हसताहेत*

ही अगदी अलीकडची उपहासाची गमतीदार धार असलेली विद्रोही अभिव्यक्ती पण एरव्ही या 'उपऱ्या' चा तो पिंड नव्हेच.

**(ब) निसर्गाशी समरसता–**

डहाके यांच्या कवितेतील 'उपरा' याही पर्यायाची निवड करताना दिसत नाही. सुंदर निसर्गाशी समरसता यामध्ये तो मुक्ततेचा शोध घेत नाही. असे अगदी क्वचित एक-दोन क्षण येतात की निसर्गाच्या सौंदर्यस्पर्शाने एरव्हीच्या अर्थशून्य नीरस भाववृत्तीतून मुक्त होत एक वेगळ्या प्रकारची आनंदमय संवेदना जगताना तो दिसतो–

*...माझ्या रखरखत्या छातीवर मी झेलतो नव्या पावसाच्या धारा*
*डोळ्यांत जमलेल्या चिकट रक्तावर पसरतो निळा प्रकाश*
*आणि माझ्या अस्थिमांसचर्मातील काळ्या पक्ष्यांचे पंख उजळतात हिरवे*

असेच एखाद्या 'मूड' मध्ये शिरताना, निसर्गातील सौंदर्य त्याच्या मनात प्रतिमा रूपांतून फुलताना दिसत असते–

*...आज पुन्हा सूर्य फुलासारखा कोमल वाटतो आहे*
*नुकतीच उमललेली शुभ्र-तांबडी कमळफुलं*
*तुझी आठवण करून देतात*
*आज पुन्हा सूर्य तुझ्यासारखा कोमल वाटतो आहे.*

पण एरव्ही झाडे-पाने, पशु-पक्षी, समुद्र, पाऊस, संध्या-रात्र, चंद्र-नक्षत्रे या सर्वांमध्ये या उपऱ्याला दिसत असते-परतं तेच-केवळ जाळ, काळी राख, लाल रक्त आणि कोसळणे, विझणे- नासणे सर्वत्र विदारक भाववृत्तींची नकारार्थी मालिका–

हिरव्या पानांची झाडे अशी–

*.... मला दिसला होता जाळ दूरवर*
*हिरव्या पानांची काळी राख करून टाकणारा*
*.... हे आहे कोसळत्या झाडाचं स्वागत*
*त्यांचं सळसळणं हल्ली ऐकू येत नाही*
*तर झाडांचं विझल्या स्वरातलं हे बोलणं*

पक्षी असे–

*...मी हाकांनी रान भरून टाकलं*



अनुक्रमणिका







*पण कुठल्याही पाखरांचा पंख देखील हालला नाही*
*...दूर टेलिफोनच्या तारांवर चिमण्यांसारखे काही पक्षी*
*एकाकी. त्यांचा किलकिलाट. दुपारचा सुनेपणा अधिक वाढविण्यासाठी*
*...हंस गात आहेत मृत्युसमयीचे गाणे*

समुद्र तसाच–

*...त्या संध्याकाळी समुद्र एखाद्या रक्ताळलेल्या*
*घोड्यासारखा वाटला*
*...समुद्र कोंडून पडलाय गगनचुंबी इमारतींच्या गजाआड*
*पाऊस रक्ताचा–*
*...पाऊस रक्तासारखा लाल आणि काळवंडत जाणारा*
*अविरत कोसळत असतो कवीच्या आयुष्यावर कवितेवर*
*संध्याकाळ-रात्र-चंद्र असेच–*
*...संध्याकाळ म्हणजे कर्वत आहे*
*सबंध दिवसाच्या शरीरातून मंद गतीनं फिरत असलेली*
*...एक एक नक्षत्रांची रात्र उमलून नासून जाते*
*...जंगली बैलासारखा चंद्र*
*मुसंडी मारून पुढे येतो*
*हिरव्या अलौकिक झाडीतून*

तर ही अशी त्याची निसर्गाबरोबरची विपरीत समरसता. त्याच्या सौंदर्याशी एकरूप-समरस होण्याऐवजी, अर्थशून्यतेतून मुक्त होण्याऐवजी त्या सुंदर निसर्गावरच आपली अर्थशून्यता लादत असतो आणि त्याच विपरीत अर्थशून्य भाववृत्तीत हा 'उपरा' अधिकाधिक बुडत असतो.

**(क) प्रियतमेबरोबरची रममाणता–**

अस्तित्वशून्यतेच्या संदर्भात, मुक्ततेसाठीचा एक महत्त्वपूर्ण पर्याय म्हणजे प्रियतमेबरोबरची रममाणता.

प्रियतमा हा पुरुषाच्या सांत्वनाचा किनारा असतो. बधिर अवस्थेवरचा उतारा असतो. येथे दु:खाचे कढ शांत करता येतात. एकाकीपणाला येथे सोबत मिळते. अर्थशून्यतेला अर्थपूर्णता लाभण्याची शक्यता निर्माण होते.

(१) म्हणूनच बधिर, वैफल्यग्रस्त, त्रासलेला, पेटलेला, चिरत गेलेला, छिन्नविछिन्न झालेला, वाळवी लागून मातीत जणू विरघळून गेलेला, शून्यवत झालेला तो 'उपरा' प्रस्तुत 'प्रदेश' या कवितेत प्रियतमेकडे येतो.

*तुझ्या डाव्या कुशीत येतो, उजव्या.*
*डोकं खुपसतों, तुझ्या छातींत, मांड्यांत.*



अनुक्रमणिका

*पडून राहतों शेजारीं, उठतों, पुन्हा येतो.*
*तुझा स्पर्श शोधत.*

सारी तडफड विझविण्यासाठी, त्याची आग शांत करण्यासाठी, त्याला प्रियतमेचा स्पर्श हवाय, तिचं अवघं शरीर हवंय.

(१) शरीर विझतं. पण मन अशांतच राहातं. त्या वेळी–

'तुझंमाझं सोबत असणं' हे 'न भरणाऱ्या घावासारखं' असलं तरी त्याला ते तिचं 'सोबत असणं' हवं असतं.

पहिल्या खंडात आलेला उत्कट कामभाव आणि उर्वरित खंडांमध्ये आलेला संयत-समजुतदार प्रेमभाव या दोन्ही गोष्टी मुक्ततेसाठीच्या संदर्भात अभिप्रेत आहेत.

कवी वसंत आबाजी डहाके यांनी स्वत:च्या कवितेतील स्त्रीविषयी एक टिपण लिहिले आहे. त्यामध्ये त्यांनी कवीची आत्मानुभूतीपर वैयक्तिकता आणि प्रतिभास्पर्शित सार्वत्रिकता या गोष्टींचे कवितेतील स्थान स्पष्ट करीत त्यांच्या कवितेतील स्त्रीविषयी विस्ताराने लिहिले आहे. आपल्या प्रस्तुत लेखाचे शीर्षक 'प्रदेश' च्या निमित्ताने वसंत आबाजी डहाके' असे असल्याने त्यांच्या टिपणातील काही संदर्भ आपण मांडत असलेल्या भूमिकेला पोषक ठरतील असे वाटल्याने येथे देणे औचित्याचे ठरावे.

अनुभवनिष्ठ वैयक्तिकता आणि सार्वत्रिक अर्थवत्ता याबद्दल ते लिहितात–

'कविता म्हणजे कवीचे आत्मचरित्र नव्हे; पण त्याच्या अनुभूतीचे चरित्र ती असण्याची शक्यता असते... कवी स्वत:चा अनुभव सार्वत्रिकतेत मिसळतो. त्याला सार्वत्रिकतेचा स्पर्श देतो. असे एक विचित्र तयार रसायन घडते. जे त्याचे वैयक्तिकही वाटते आणि जे सार्वत्रिकही वाटते– जे सार्वत्रिक अर्थ देते.'

पुढे ते स्त्रीबद्दलचा कामभाव आणि प्रेमभाव यांबद्दल विस्ताराने आणि खुलेपणाने लिहितात. आपल्याला येथे त्यांनी निर्माण केलेल्या 'उपरा' मध्ये वैयक्तिक डहाके यांचा शोध घ्यावयाचा नसला तरी त्यांची या संदर्भातली स्त्रीविषयक जीवन जाणीव, स्त्रीविषयीच्या त्यांचा दृष्टिकोन अभिप्रेत असतोच.

(अ) 'प्रदेश' या कवितेत सारे अस्तित्व अस्वस्थतेने तडफडत असताना तो 'उपरा' त्याच्या प्रिय स्त्रीच्या कुशीत, छातीत, मांड्यांत, तिच्या शरीरात, त्याची अस्वस्थ तडफड विझवतो. डहाके यांच्या अशाच काही कवितांमध्ये हेच घडत असते.

साक्ष म्हणून त्यांच्या टिपणातील काही संदर्भ नोंदवू या.

ते लिहितात की, 'लैंगिक कृती, अस्तित्व आणि त्याला जखडणारे एकाकीपण मिटविण्याची प्रतीकात्मक कृती बनते. त्यांच्या कवितेत येणारी कामात्म ओढ ही जैविक पातळीवर अर्थशून्यतेला अर्थ देण्याचा प्रयत्न करते :

उदा.

*मी स्वत:ला आता तुझ्यात सोपवतो आहे*










*तू मला संपव*
*विझव माझं अस्तित्व*
*...तू आहेस भूक*
*आणि तू आहेस माझं अन्न*
*तू आहेस*
*माझं भस्म, माझी राख, माझा अंगारा*

....'स्वत:च्या काळ्या रक्ताचा आक्रोश' त्याला ऐकू येतो. 'रक्तातील वादळाचा झणझणाट' ऐकू येतो. स्वत:च्या शरीरात हिंडणारा 'तरस' तो पहातो आणि

*ये भुकेल्या श्वापदाप्रमाणे*
*आणि तुटून पड माझ्यावर*

अशी शरीराची अदम्य हाक तो ऐकतो

ते म्हणतात की, 'येथे दुसरी व्यक्ती ही पहिलीसाठी केवळ लैंगिक 'वस्तू' नाही, तर मुक्तीचे माध्यम आहे.' (शारीरिक पातळीवरही)

(ब) प्रेमभाव ही प्रियतमेबद्दलची शरीरापलीकडली दुसरी भाववृत्ती, ही अधिक महत्वाची.

'प्रदेश' या कवितेतील 'तुझं माझं सोबत असणं' हे अधिक महत्त्वाचं. 'स्वत:ला सावरत मला हात दे, मला वर उचल' हे अधिक महत्त्वाचं. जगण्याच्या ज्वालांनी होरपळून काळा झालेला तिचा चेहरा असहाय्य तळहातांनी अंतर्यामीच्या जिव्हाळ्याने चाचपणं हे वेगळ्या पातळीवरचं भावस्पंदन अधिक महत्त्वाचं.

शरीर केवळ कामक्षुधेची पूर्ती करण्यासाठी नाही, याची यथार्थ जाण असल्याने त्यांच्या उपऱ्याला दुसरे शरीर हवे ते आपल्या अस्तित्वाच्या अर्थासाठी, 'भयाणरिक्त' आकाशाखाली तो आपले अधांतरी असलेले आयुष्य पाहातो, आणि त्याला दुसऱ्या शरीराची आवश्यकता वाटते.

*एकत्र असणे म्हणजे 'एका'ला अर्थ येणे*
*हेही माझंच एक शरीर माझ्याशीच बांधलेलं*

असे एक नवे भान त्याला येते. एकाने दुसऱ्याचे असणे आणि दुसऱ्याने एकाचे असणे यांत दोहोंचे 'असणे' सामावलेले असते. 'असणे' म्हणजे 'अर्थपूर्ण' असणे.

**(ड) जीवनोत्सुक सृजनशीलता**

या अर्थशून्य 'प्रदेशात अर्थपूर्ण होण्यासाठी मृतवत् अर्थशून्यतेतून मुक्त होऊन चैतन्यपूर्ण अस्तित्व साकारण्यासाठी जीवनोत्सुक सृजनशीलता या पर्यायाचा आता विचार करावयाचा.

वसंत आबाजी डहाके यांच्या 'शुन:शेप' च्या Blurb वरील प्रभा गणोरकर यांच्या मताने या पर्यायाचे प्रास्ताविक करू या.

'...भोवतीच्या विकट वास्तवात पायाखालचे सगळेच आधार नाहीसे झालेल्या एका मानवी अस्तित्वाने पुन्हा एकदा कवितेलाच हाक घातली आहे. कवितेतून तो व्यक्त करतो



अनुक्रमणिका






आहे आपले प्राणभय, आपला आकांत, तडफड, उद्वेग आणि भ्रमनिरास, कवितेतून तो व्यक्त करतो आपल्या अस्तित्वाला असलेला कवितेचा आधार... येथे 'कविता' ही सबंध अस्तित्व आणि जीवन व्यापून टाकणारी एक आदिबंधात्मक प्रतिमा बनते.

या कवितेमागे सनातन जीवनमूल्यांचा आणि नैतिकतेचा आग्रह धरणारे एक संवेदनशील मन स्पंदन पावताना जाणवत राहते. कविता या रूपबंधातून किती तरलपणे ते स्वत:ला व्यक्त करीत राहाते हेही.'

कवी वसंत आबाजी डहाके आणि त्यांची कविता यांबाबतचे हे Blurb अन्वर्थकच आहे.

व्यापक अर्थाने नृत्य, संगीत, चित्र, शिल्प, काव्य, इतकेच नव्हे, तर विज्ञान, तत्त्वज्ञान आदी मानवाच्या सर्व प्रकारच्या 'होण्या' मागे जीवनोत्सुक सृजनशक्ती असते. मानवाच्या ठिकाणी असलेली सृजन ही आदि-ऊर्जा आहे. मानवाच्या या पृथ्वी नावाच्या 'प्रदेशा'वर जेव्हा सृजन जागे झाले नव्हते, तेव्हा तेथे फक्त एक पेटता आकांत होता आणि जेव्हा येथील सृजन संपेल, तेव्हा येथे परत जळालेल्या आकांताची राख दिसेल. असे या सृजनाचे अधोरेखित आहे.

म्हणूनच या 'पृथ्वी-प्रदेशा' वरील पेटत्या आकांतातून मुक्त होण्यासाठी डहाके यांच्यासारखे कवी जीवनेच्छा सुफल करण्यासाठी, जीवनाला अर्थपूर्ण करण्यासाठी त्या सृजनशक्तीला आवाहन करीत असतात.

कवितेच्या संदर्भात कविता हे सृजनशक्तीचे एक व्यक्त रूप; पण या व्यक्त रूपापाठीमागे तिचे अमूर्त अशरीरी सर्जक तत्त्व असते.

त्या अमूर्त सर्जक तत्त्वशक्तीला आवाहन करून निर्मितीच्या विविध कल्पक रूपांना जन्म देणे, सर्व प्रकारच्या अर्थशून्यतेला अर्थपूर्ण करण्यासाठी आवाहन करणे असा मुक्ततेसाठीचा पर्याय, डहाके यांचा (आणि त्यांच्यातील) 'उपरा' निवडतो.

प्रस्तुत लेखाच्या पूर्वार्धात 'प्रदेश' या कवितेची अधोरेखित करावी अशी जी लक्षणीय विशेषता म्हटली आहे, ती म्हणजे या सृजनशक्तीला, या कवितेत केलेले आवाहन.

या कवितेच्या पहिल्या पातळीवरच्या वाचनातून जाणवते की, या कवितेतील 'ती' ला उद्देशून केलेले जे आवाहन आहे, ते मानवी स्त्रीला मानवी प्रियतमेला केलेले पहिले जैविक पातळीवरचे आणि त्याचबरोबर दुसरे भावनिक पातळीवरचे आवाहन आहे, ज्याबद्दल या लेखाच्या पूर्वार्धात विस्ताराने लिहिले आहे.

पण या कवितेच्या दुसऱ्या अधिक सूक्ष्म अर्थशोधक वाचनातून, अधिक आत शिरून प्रत्यय घेत असताना, जे जाणवत जाते, ते म्हणजे, आपली प्रेतवत् बधिरता व्यक्त करीत, तिच्यातून मुक्त होण्यासाठी सृजनशक्तीला केलेले हे आवाहन आहे.

जाणिवेच्या पातळीवरून, स्वत:शी आणि मानवी स्त्रीबरोबर साधलेला हा संवाद आहे, असे दिसत असले तरी नेणिवेतून मुक्ततेसाठी स्फुरलेले, सृजनशक्तीला केले गेलेले, हे उत्कट आवाहन आहे, असेच जाणवते.



अनुक्रमणिका

**पहिल्या खंडात–**

मन त्रासलेलं, पोळलेलं असो की आक्रांतानं पेटलेलं असो, त्या अवस्थेतून सुटण्यासाठी, सृजनशक्तीशी क्रीडा-तिच्याशी सर्व परीचा अंगसंग हाच पर्याय तो शोधू पाहातो कलानिर्मितीच्या संदर्भात, भावरंगतरंगांशी क्रीडा, नादगंधरंग आदी संवेदनांशी क्रीडा, मूर्तअमूर्ताशी क्रीडा, लयतालाशी क्रीडा, प्रास-अनुप्राशांशी क्रीडा, झनन झांजरे शब्दांशी क्रीडा, रंगरेषा-शिल्पमुद्रा-स्वरनर्तन-कल्पक प्रतिमा आदीशी क्रीडा असा तिच्याबरोबरचा सर्व परीचा अंगसंग हाच पर्याय तो शोधू पाहातो.

**दुसऱ्या खंडात–**

कित्येक दिवसांत काही चांगलं घडत नाही... चांगलं घडण्याच्या सगळ्या शक्यता मावळून गेल्या आहेत. चांगलं घडण्याच्या इच्छांची प्रेतं सडत चालली आहेत. नुसते साहतो आणि वाहतो अशा शून्याकारात, घडविण्याची, 'होण्या' ची शक्यता, काही निर्माण करण्याची शक्यता, सृजनशक्तीतच असू शकते म्हणून हे नैराश्यभावभाषित तिलाच उद्देशून केलेलं आहे, हेच संभवतं.

**तिसऱ्या खंडात–**

या जळालेल्या ओसाडीच्या, स्वतःला उसवून जायच्या वेडसर प्रदेशात निभावून न्यायचं कसं? कर्कश आवाजाच्या या प्रदेशात, काळजात क्षीण होत चाललेलं 'गाणं' जगवायचं कसं, हा प्रश्न. या क्षीण होत जाणाऱ्या 'गाण्या' ला, या क्षीण होत चाललेल्या कवितेला चैतन्याचा बहर आणायचा असेल तर... त्या प्रश्नातच अंतर्भूत असलेली आर्त हाक सृजनशक्तीलाच आहे, हे स्पष्ट होतं.

**चवथ्या खंडात–**

जवळजवळ सारंच संपलं आहे आणि आपण विनाशाकडे जात आहोत, हे जाणवल्याने जगण्याला कुठलाच आधार शिल्लक राहिला नाही अशा निराधार भाववृत्तीत कुठंतरी जगण्यासाठीचे अंकुर पालवावेत, त्यासाठी आराधना सृजनाचीच करावी लागणार हेच सूचित होते.

**पाचव्या खंडात-**

आत्मा, देह-देहात्मा या सर्वालाच संपूर्ण बधिरता आल्यानंतर, सारं अस्तित्व संपलंय, मृत झालंय, अशा मनोवस्थेत चैतन्याचा श्वास ओतणाऱ्या, चैतन्याची जाग आणणाऱ्या सर्जनशक्तीलाच आवाहन करावं लागणार, हाच एकमेव पर्याय आता शिल्लक असणार, असंच जाणवू लागतं.

या कवितेतील पाचव्या खंडापर्यंत आलेल्या भावार्थवाहक प्रतिमा प्रसादगुणाने अन्वित असल्याने त्या रसिकाला अगदी पारदर्शक होऊन भावतात.

पोळलेलं कुत्र, आकांतानं पेट घेतलेलं अस्तित्व, तापलेले रस्ते, वाळून पाणी जिरून

जावं तशा मावळून जाणाऱ्या साऱ्या शक्यता, हातावरून काच फिरवावी तसं चिरत जाणारं आयुष्य, छिन्नविछिन्न मनं, इच्छांच्या धांदोट्या, पिळवटलेली झाडं, जळालेली जमीन, ओसाडीचा भणभण वारा, वाळवी लागून मातीत रूपांतरित होणारी झाडं, बधिर होणारा मेंदू आदी प्रतिमा 'उपरा' ची जी काळोखी, उद्ध्वस्त, वैफल्यग्रस्त निराधार, शून्यवत् भावावस्था आहे, ती उत्कटतेने रसिकाला भिडावी अशा या सर्वच टोकदार आणि पारदर्शक प्रतिमा आहेत– झटिति प्रत्यय देणाऱ्या आहेत.

**सहाव्या खंडात**

येथील प्रतिमांचा अन्वयार्थबोध आणि काव्यार्थग्रहण या गोष्टी रसिकाच्या बोधनेला आणि रसिकतेला काहीशा अवघडच होऊन बसतात. पण उत्तम कवितेतील अशा प्रतिमा अनेकार्थसूचक असतात. रसिकांच्या कल्पक प्रज्ञेत, त्या नव्या नव्या उन्मेषांचं –नव्या नव्या संभाव्य अर्थांचं सूचन करीत असतात.

एखाद्या कल्पक प्रज्ञेतील येथील अर्थसूचन असंही असू शकतं :

इथं एक डोह आहे. त्याच्या तळाशी एक हिरवं तळघर आहे. तेथे असलेल्या तिला त्याचं सांगणं आहे, 'तू इथवर मला ओढत आणलंस. आता थकू नकोस. तू ऊठ. स्वत:ला सावर आणि मला हात दे. वर उचल. हे केलं नाहीस तर काळोखी पाण्याचा दाब, या तळघराचं दार आतून लावून घेईल.'

हा डोह म्हणजे नेणीव, त्या नेणिवेच्या खोल तळघरातील हिरव्या चैतन्यदायक सृजनशक्तीला त्याचं सांगणं आहे, 'माझ्या जीवनोत्सुकतेला जपत, परस्परांच्या साथसोबतीनं सर्जन करीत, तू मला इथवर आणलंस, पण आता जीवनाला ओढ लावणारं, आकर्षून घेणारं, अर्थ देणारं, आयुष्याला कापीत पुढे नेणारं, जीवनाला फुलवणारं तत्त्व मागं पडलं आहे. सरून गेलं आहे आणि निर्मितीला बांध घालणारं काळोखी तत्त्व, आपण येथून बाहेर पडण्याआधीच येथील दार आतून बंद करून घेईल आणि आपण दोघं आत कोंडून पडू. तुझ्या-माझ्या सोबतीनं होणारी निर्मितीच कोंडून राहील म्हणून येथून बाहेर पडण्यासाठी हात दे. मला वर उचल.'

मानवी अस्तित्वाला वरच्या दिशेने जावं असंच वाटत असतं. काहीच घडत नाही, काहीच निर्माण होत नाही म्हणजेच सृजनशक्ती क्रियाशील नाही म्हणून तिला निर्मितीसाठी क्रियाशील होण्यासाठी, त्याचं सांगणं आहे, 'तू ऊठ. क्रियाशील हो. निर्मितीसाठी मला हात दे.'

**सातव्या खंडात–**

त्याच्यातील जगण्याच्या ज्वालांनी, सोबत करणाऱ्या त्या सृजनशक्तीचाही चेहरा काळा पडणार, तीही कलाहीन होणार या जाणिवेने, कलावंताच्या संवेदनशील बोटांनी, तिच्या चेहऱ्यावरून स्नेहार्द्रतेचा हात फिरवीत, तिचं अस्तित्व थरथरत्या स्पर्शाने चाचपत 'स्वत:ला सावर. थकू नकोस' असं मनोमनीच्या आत्मीयतेने पुन्हा एकदा सांगत सर्जनासाठी साथसंगत देण्यासाठी तो साद घालीत आहे.



अनुक्रमणिका

तेव्हा या कवितेचे एखाद्या रसिकतेला भिडत असलेले वैशिष्ट्य हे की, डहाके यांच्या 'उपरा' च्या संदर्भात या 'प्रदेशा'तील बधिर अर्थशून्यतेला चैतन्यपूर्ण अर्थपूर्णता देणारा जो अधिक अर्थपूर्ण मुक्ततेसाठीचा पर्याय म्हणजे जीवनोत्सुक सृजनशक्तीला केलेले आवाहन होय.

**प्रा. एम. पी. पाटील.**
सी-२५/१५, जीवन बिमानगर, बोरीवली (प.), मुंबई– ४००१०३.
दूरभाष– २८९३३९२४



---

## साभार पोच

**काखेत कळसा गावाला वळसा :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४०
**नारद झाले गारद :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४०
**खोट्याच्या कपाळी गोटा :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे २८
**साक्षरतेची पालखी :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६
**अबब! माणसंच माणसं! :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६
**मुलापेक्षा मुलगी बरी :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६
**गुन्हेगारांच्या मागावर :** यशवंत व्हटकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १६८
**पुरुषांना सुद्धा शिंग असतात :** प्रकाश लोंढे, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६६
**प्रत्ययकारी वास्तव :** शशिकांत दत्तात्रय चिटणीस, मुग्धा प्रकाशन, कात्रज, पृष्ठे ६६
**डॉक्टर :** चंद्रकांत शंकर वागळे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १३६
**वेचलेले मोती :** दिलीप मोडक, अक्षरमुद्रा प्रकाशन, नासिक, पृष्ठे ६०
**माझी अमेरिकेची आनंदयात्रा :** विमल शरदचंद्र कवडे, सुरेखा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०
**भिकारी व पुढारी :** भारत सातपुते, प्रकाशक दयानंद शेटगार, लातुर, पृष्ठे ४४
**फिल गुड :** भारत सातपुते, प्रकाशक दयानंद शेटगार, लातूर, पृष्ठे ७६
**पुरचुंडी :** संपादन फ. म. शहाजिंदे, प्रकाशक दयानंद शेटगार, लातुर, पृष्ठे २५२
**अभिरायण :** लेखक व प्रकाशक गंगाधर काशिनाथ पारोळेकर, पृष्ठे १४८
**भूप :** मोनिका गजेंद्रगडकर, मौज प्रकाशनगृह, मुंबई, पृष्ठे १५२
**प्राचीन भारतीय विमानशास्त्र :** आनंद जयराम बोडस, मनोरमा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ११२
**कणवेचा सोन्याचे :** अरुण हरकारे, कुलस्वामिनी प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ७२
**गोकुळ वाटा :** लक्ष्मीकांत तांबोळी, रूपक प्रकाशन, नांदेड, पृष्ठे ९१
**मजेत जगावं कसं? :** शिवराज गोर्ले, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे २६८

# 'विठ्ठल मागे मुक्ती'



डॉ. मो. गो. धडफळे

**भक्तांनो, मला सोडवा**

विठ्ठलाकडे अनेक संतांनी, वारकऱ्यांनी व भाविक मुमुक्षूंनी 'मुक्ती' ची मागणी केली आहे. पण साक्षात विठ्ठलच त्याच्या पारंपारिक मानकऱ्यांकडून मुक्तीची इच्छा धरून 'विद्रोही विठ्ठलाचे रूप धारण करू पाहत असेल का?' नाशिकमध्ये नुकतेच ७८ वे मराठी साहित्य संमेलन सुफल रीतीने पार पडले. त्याचा वृत्तांत देताना अनुभवी पत्रकार श्री. संतोष शेणई यांनी एक आशादायक, बदलत्या वर्तमानाचे रूप त्यांच्या वृत्तात ('रविवार सकाळ' ६ फेब्रुवारी २००५, पृ. ३.) ठळकपणाने सादर केले. ''नाशिकात मंदिर-प्रवेशासाठी डॉ. 'आंबेडकरांना' सत्याग्रह करावा लागला होता. जेथे हे संमेलन भरले होते त्या इमारतीचे भूमिपूजन छत्रपती शाहू महाराजांनी केले होते. संमेलनाच्या अध्यक्षस्थानी प्रा. डॉ. 'मेश्राम' होते. समारोपानंतर त्यांच्यासाठी संयोजकांनी पायघड्या घातल्या.'' विषमतेकडून समतेकडे, भक्तीबरोबरच राष्ट्रभक्ती वाढत असल्याचा भरपूर जमेचा हा भाग आहे. राष्ट्रभक्तीबाबत अध्यक्षांची सूचनाही मोलाची ठरली, ग्रंथदिंडीत 'ज्ञानेश्वरी' ठेवाच पण 'भारतीय राज्यघटना'ही ठेवा.

**दुसरी बाजू :**

या संमेलनाला पूरक ठरेल असा खास लेख श्री. शिवराम सुखी यांनी लिहिला (म. टा. फेब्रुवारी ९, २००५) पंढरपुरातील चंद्रभागेच्या काठी विद्रोहींच्या एका तुकडीने विठ्ठलाचे मक्तेदारी असलेल्या पारंपरिक घराणेशाहीला दूर करण्यासाठी जागर केला. या विषयीचा सविस्तर वृत्तांत यात आहे.

अजून हा प्रकार करावा लागतो, याचे इतिहासाची पाने चाळणाऱ्या माझ्यासारख्या वाचकाला आश्चर्य वाटते. भारतीय संस्कृती परिवर्तनशील आहे. पण ही परिवर्तने नेहमीच प्रगतीच्या दिशेला फिरली नाहीत. मध्येच केव्हातरी 'घूम-जाव' केल्यासारखी ती अप-गतीनेही जाताना दिसतात. ऋग्वेदात मृताच्या पत्नीला ''हे बाई तू चितेपासून ऊठ व दिराचा हात धरून नव्याने जीवनास प्रारंभ कर.'' असे म्हणून अशा स्त्रीला 'पुनर्भू' ('पुन्हा जन्माला आलेली') असे संबोधले आहे. तर नंतरच्या काळात रानटी 'सती' ची चाल नेमकी कुठून आली? पुढच्या काळात मुण्डित-विधवांचे जीवन त्यांना असह्य का झाले असावे? शंकर



अनुक्रमणिका






मामंजींच्या इच्छापूर्तीचा प्रसंग त्यांचेवर का आला असावा? मुलगा गेल्याने सासऱ्याने विधवा सुनेचे आपणहून योग्य स्थळी लग्न लावून दिल्याच्या बातमीचा एवढा आनंद जाहीर पत्रे लिहून (दै. सकाळ. वाचकांचा पत्र व्यवहार. १०.२.०५) का व्यक्त करावासा वाटतो? हे सामान्य (Normal) का ठरू नये?

डॉ. आंबेडकरांना नाशिकच्या देवळात अस्पृश्यांना प्रवेश देण्यासाठी आणि सानेगुरुजींना पंढरपूरच्या विठ्ठल मंदिरात हरिजनांचा प्रवेश मान्य होण्यासाठी उपोषणादी चळवळींचा अंगीकार का करावा लागला?

इतिहास तर कमालीचे आश्चर्य वाटायला लावेल असा आहे. मंदिरांची मालकी-म्होरकी ब्राह्मण किंवा इतर तथाकथित उच्चवर्णीयांकडे आलीच कशी? इतिहासात ती त्यांच्याकडे नव्हती, एवढेच नाही, तर ब्राह्मण जमात मुळात मंदिरात मूर्तीची पूजा करायलाच तयार नव्हती. मूर्तीतीच काय, पण कोणाचीही, कोणत्याही स्वरूपातली 'पूजा' ही ब्राह्मण 'धर्म' म्हणून मानायला तयार नव्हते.

वैदिक आर्यब्राह्मणांचा धर्म एकच! वेदोक्त यज्ञविधी (होम-हवनादी). यज्ञात चंदन नाही, धूप, दीप, अगरबत्ती नाही, तुळस, पाने, फुले नाहीत. यज्ञात देवतांच्या 'मूर्ती' नाहीत. एकूणंच 'पूजा' नाही. पूज्-पूजयति हा धातू संस्कृतात द्रविडी जोडशब्दांचे संस्कृतीकरण करून वापरला जाऊ लागला. तमिळमध्ये 'पू' (कन्नड 'हू') म्हणजे 'फूल' व 'जये' किंवा 'गये' म्हणजे मण्डित करणे, पूजा बांधणे म्हणजे पुष्परचनेने मूर्तीला सजवणे.

## शूद्रांनी त्रैवर्णिकांना मंदिरप्रवेश दिला

होय! आश्चर्य वाटेल पण हे सत्य आहे. आपण इतिहासाचे योग्य भान ठेवत नाही एवढेच. ऋग्वेदादी वैदिक साहित्यात स्तोत्रांनी आवाहन केले की त्या-त्या अमूर्त देवता दर्भासनावर येतात व आहवनीय अग्नीत टाकलेल्या हविर्भागांचे सेवन (?) करतात अशी कल्पना आहे. या यज्ञविधीची तत्त्वचर्चा करणारे 'मीमांसा' शास्त्र! या शास्त्रानुसार 'देव' यज्ञही करू शकत नाहीत. कारण देवांना आङ्गिक अवयव' (हात, पाय, मुख इ.) नाहीत.

मूर्तीकरण हे बहुतेक सिंधू संस्कृतीतून आर्य भारतीयांनी बरेच नंतर स्वीकारले आहे. फर्कुहर (Ferquhar) या प्राच्य पंडितांच्या मताप्रमाणे मूर्ती-मंदिरे व देवालये ही मुळातच शूद्रांची (अवैदिक) होती. अशा 'अयज्ञास:' (यज्ञ न करणाऱ्या) 'भूरदेवा:' (मूर्तदेव मानणार) यांचे क्वचित उल्लेख ऋग्वेदात येतात. देवांच्या प्रतिमा व देवालये ही मुळात शूद्रांची असून खिस्तपूर्व ४०० च्या सुमारास शूद्रांनी ही मंदिरे त्रैवर्णीकांसाठी खुली केली. सिंधु-संस्कृती, दास-संस्कृती (म्हणून 'भक्त' वा 'सेवक' या अर्थाने रामदास, पुरंदरदास या नावात 'दास' हा शब्द.)

## देऊळ :

'देवालय' या शब्दापासून 'देऊळ' हा शब्द आला नाही. राज + कुल यापासून 'राऊळ'










तसा देव + कुल यापासून 'देऊळ' हा प्राकृत शब्द सिद्ध होतो. यापुढचा भाग अधिक महत्त्वाचा आहे. प्रारंभी 'देऊळे' ही 'राऊळे' च होती. कारण 'राजा' ला 'देव' हा शब्द वापरीत. संस्कृत नाटकांत 'यथा देव: आदिशति', 'अत्र देव: प्रमाणम्' असा राजवाचक देव शब्द येतो. बौद्ध संस्कारांनी प्रभावित झालेला सम्राट अशोक बौद्धधर्म 'देव' मानत नसताही स्वत:ला 'देवांनां प्रिय:' म्हणवतो; म्हणजे आजूबाजूच्या 'राजमंडळात प्रिय' असणारा असाच अर्थ करणे योग्य ठरेल. चार्वाकसूत्रात तर स्पष्ट म्हटले आहे. 'लोकसिद्ध: राजा परमेश्वर.' लोकांना संमत असलेला 'राजा' म्हणजेच 'परमेश्वर'. ईश्वर हा शब्द अधिक करून 'राजा' साठीच येतो; 'Personal God' (व्यक्त देवता) यासाठी कमीच! प्राथमिक देऊळे वा 'देवकुळे' (देवकुल') म्हणजे दिवंगत राजांची 'मूर्तिमंदिरे.' दशरथाचे निधन तोंडाने सांगण्यापेक्षा सुमंत भरताला रघूच्या देवकुळात (प्रतिमागृहात) घेऊन जातो. तेथे दशरथाची मूर्ती पाहून भरताला दशरथाचे निधन झाल्याचे कळते. (भासाच्या यासंबंधीच्या नाटकाचे नाव यामुळेच 'प्रतिमा')

**देव डोंगरी राहतो :**

रामदास म्हणतात, 'दास डोंगरी राहतो' देवदासाप्रमाणे 'देव' ही मुख्यत्वे डोंगरी राहणारे आहेत. 'भूमिकन्या' यासारखा पर्वत-जन (Hill-men) हा शब्द आहे. हे सर्व पर्वतक (पहाडी) होते. अनार्यांची तटबंद्या असणारी 'पुरे' समजावून घेतली की मराठेशाहीत गडांना राजधान्यांचे महत्त्व का यावे, हे कळते. 'लङकै (लङ्का) म्हणजे मुळात 'उंच' (म्ह. 'उंच') 'टेकडीवरील राजधानी' भारतातील अनेक मंदिरे डोंगरावर आहेत. द्राविडी भाषेत 'मलै' (अन्नमलै) म्हणजे पर्वत, डोंगर (मलय), तेथील अरि (देव) तो मल्लारी-मल्हारी मार्तण्ड. पर्वतकन्या ती 'पार्वती' किंवा 'शैलात्मजा', 'शैलजा'. या गिरिकन्येचा एका गिरि-कुमाराशी (गिरीश व गिरिश) 'शिवा' शी विवाह होतो. शिव दक्षिणेकडचा. दक्षिणेत बहुतेक शिवालये अधिक. शिवमूर्ती म्हणजे 'दगडाची पिंड.' ती एखाद्या डोंगरातील गुहेत ठेवली की 'शिवालय' तयार! प्रसिद्ध कन्नड 'त्रिपदी' कार सर्वज्ञ म्हणतो, "दगडावर दगड रचून बांधलेल्या घरात देव म्हणून एक दगड ठेवून त्याला पूजणाराही दगडोबाच!"

(कल्लु कल्लनेय ओट्टि, वल्लनल्लि मने कट्टि....)

**समारोप :**

विस्तारभयास्तव काही मुद्द्यांचे केवळ टिपण ठेवू या.

१. वेदसाहित्याचा व पर्यायाने आर्य ब्राह्मणांचा धर्म 'यज्ञ' आहे, पूजा नाही. 'षोडशोपचार' पूजापद्धतीचा निर्देशही मूळ वैदिक साहित्यात नाही.
२. पूजाविधी, मूर्ती व देवालये आर्य-आगमनपूर्वीच्या एतद्देशीय आदिवासींची आहेत.
३. या आदिवासींना 'शूद्र' या संज्ञेखाली चातुर्वर्ण्यात समाविष्ट करून वरील तीन वर्णांतले पुरुष चवथ्या वर्णातील स्त्रीशी विवाहबद्ध होऊ लागल्यावर या चवथ्या वर्णाने आपल्या देवता व त्यांची मंदिरे यांची पूजा या ब्राह्मणादिकांना करायची विनंती केली.

४. आग्रही सनातनी ब्राह्मण यज्ञधर्म सोडून मंदिर-देवतांची पूजा करायला नाखूषच होते. ज्या ब्राह्मणांनी यास अनुमती दिली ते सनातन्यांकडून हलके ब्राह्मण, भ्रष्ट-पतित ब्राह्मण समजले गेले. इतर काही श्रेष्ठ ब्राह्मणांनी जे मूळचे 'पुजारी' होते त्यांनाच (एकापरीने गौण-स्वरूपाचे) ब्राह्मणत्व बहाल केले. परिणामान्ती हे 'पुजारी', 'गुरव', 'कोळी' असे मंदिर– सेवक 'ब्राह्मणसम' मानले जाऊ लागले.

५. काही मंदिरांत मूर्तीच्या मागे अनेक प्रकारची त्रिशूलादी हत्यारे असत. बहुधा काही काळ पशुबळी दिले जात असावेत. वैदिक ब्राह्मणांतही यज्ञकर्मात 'पशुमारणकर्मदारुण' असे शामित्रादी श्रोत्रिय होतेच. त्यामुळे या प्रथेला जैन व बौद्ध चळवळीआधी वैदिक ब्राह्मणांनीही फार विरोध दाखवला नसावा. आजही नेपाळच्या पशुपतिनाथाचे पुजारी दक्षिणेतील नायर ब्राह्मणच असतात. ते रेड्याचा बळी देतात. ज्याचे संस्कृतिकरण नंबुद्रि (नंपुथिरि) ब्राह्मण असे केले जाते. "(नम्बियन + तिरुप्पाड) म्हणजे देवपूजा श्रद्धेने (नम्बु) करणारे श्रीपाद" हे आजमितीसही फार श्रेष्ठ दर्जाचे मानले जात नाहीत.

६. यातच पुढे देवाला आरसा दाखवणारे, पंढरीनाथाची श्मश्रू चांदीच्या आयुधाने करणारे असे सेवेकरी आले. देवाला शय्याभोगही हवा म्हणून नर्तकी, देवदासी आल्या. देवापेक्षा (देवाकरता) त्या पुजाऱ्यांच्या उपयोगी पडू लागल्या. यामुळेच वेगळे नीतिनिकष असणारे ब्राह्मण देवालयातल्या पुजाऱ्यांना काहीसे हलके मानू लागले.

७. मूर्ती व देवता यांचे उल्लेख प्रथम महाकाव्यात व अधिक करून पुराणात येऊ लागले. हे साहित्यबंध श्रौत नसून स्मार्त आहेत. कल्पसूत्रात जितक्या तपशिलाने व बारकाईने यज्ञविधी सांगितलेत तसे पूजाविधी सांगणारी पूजा-सूत्रे कधीच तयार झाली नाहीत.

८. पुराणात 'माहात्म्ये' येतात. ही माहात्म्ये मुख्य देवालय व मूर्तिपूजा यांपेक्षा परिसराचा (बहुधा निसर्गरम्य डोंगरांचा, शेजारून वाहणाऱ्या जलाशयाचा, सरोवराचा) तपशील अधिक देतात. क्षेत्र-पूजा, क्षेत्र-यात्रा यांना मूर्तिपूजेपेक्षा अधिक महत्त्व या माहात्म्यांनी दिले. यानंतर मात्र व्यवसायप्रवण असे ब्राह्मणीकरण हळूहळू होऊ लागले.

बडव्यांचा इतिहास मला पूर्णपणे माहीत नाही. कोणी म्हणतात ते दक्षिणेकडून आले. विठ्ठल दक्षिणेकडून आला असला तर त्याचे मूळ पुजारीही तेथूनच आले असणे अशक्य नाही.

**डॉ. मोहन गोविंद धडफळे**

'यशोदीप' बी, रामबाग कॉलनी, पुणे ४११०३०

---

## साभार पोच

**गानयोगी कुमारगंधर्व :** पंढरीनाथ कोल्हापुरे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५२
**जे. आर. डी. मी पाहिलेले :** द. रा. पेंडसे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९८
**पानातली माणसं :** राम कदम. शारदा प्रकाशन. पुणे पृष्ठे १२०

# सामाजिक स्थिती आणि साहित्य-संस्कृती



मिलिंद बोकील

आपल्याकडे साहित्य-संस्कृतीची चर्चा ही मुख्यत्वेकरून प्राध्यापक आणि समीक्षक लोक करत असतात. ती करायची त्यांची पद्धत काय असते? तर संस्कृतीची व्याख्या करायची आणि मग त्या व्याख्येची फोड करत राहायचे. ही चर्चा साहित्याच्या संदर्भातली असली तर मग त्यासाठी भाषाशास्त्र, सौंदर्यशास्त्र, तत्त्वज्ञान अशा विषयांतले सिद्धांत वापरले जातात. ते करणे चुकीचे आहे असे नाही; पण हे सिद्धांत बहुतांशी विदेशी पंडितांचे असतात. तसे असायलाही हरकत नाही. कारण ज्ञानाचा साठा हा सगळ्यांनी मिळून वाढवायचा असतो, पण आपले अभ्यासक त्यात स्वत:ची अशी काही भर घालत नाहीत. विदेशी पंडितांची निव्वळ पोपटपंची करत राहतात आणि हे करत असताना ह्या चर्चेची एक स्वतंत्र परिभाषा करत असतात. पूर्वी आपल्याकडच्या अशा चर्चेची परिभाषा संस्कृत ही होती, जी जनसामान्यांपासून लांब ठेवली गेली. आता ती इंग्रजी आहे, जी तितकीच दूर आहे.

म्हणून आत्ताच्या घडीला साहित्य-संस्कृतीच्या चर्चेला परिभाषेच्या जोखडातून मुक्त करून सर्वसामान्यांच्या जगण्याच्या क्षेत्रात आणले पाहिजे. ही चर्चा जी सांचल्यासारखी झाली आहे, तिची दारे मोकळी केली पाहिजेत. जितके जास्त लोक त्यात सामील होतील तितकी ती अधिक कसदार आणि मनोरंजक होईल. मुख्य म्हणजे साहित्य-संस्कृती ही सामाजिक गोष्ट आहे. सामाजिक मातीतून ती उगवत असते याकडे लक्ष वेधले पाहिजे. जसा समाज असतो तशी त्याची संस्कृती असते. त्यामुळे ही चर्चा करताना समाजाची स्थिती कशी आहे, त्याची रचना कशी आहे, त्यात सध्या कोणते बदल होत आहेत आणि ह्या स्थिति-गतीचा साहित्य-संस्कृतीवर कोणता परिणाम होतो आहे हे तपासायला हवे. म्हणजे या चर्चेला सामाजिकतेचा पाया देणे आवश्यक आहे. आपल्या देशात जिथे सामाजिक इतिहास खूप लांबचा असतो आणि सामाजिक रचना विषमतेवर आधारित असते, तिथे तर असे करणे अटळच असते.

हे काम करण्याची मुख्य जबाबदारी ही लेखकांची आहे. लेखकलोक हे एका बाजूने साहित्याच्या निर्मितीशी म्हणजे भाषेशी जोडलेले असतात, तर दुसऱ्या बाजूने ती निर्मिती ज्यांच्याबद्दल होते त्या माणसांशी जोडलेले असतात. ते साहित्य-संस्कृतीच्या प्रत्यक्ष निर्माणात

सहभागी असतात. त्यामुळे ही चर्चा लेखकांनी हिरीरीने केली पाहिजे. तशी ती केली नाही, तर ती दुर्बोध होऊन जनसामान्यांच्या आकलनाबाहेर तर राहीलच, पण तिला सामाजिकतेचे भानही राहणार नाही. या भावनेपोटीच हा लेख लिहिला आहे.

ही चर्चा करण्याआधी साहित्य-संस्कृतीविषयीची समज काय आहे, हे थोडक्यात सांगितले पाहिजे. (यालाच अवघड भाषेत सैद्धांतिक मांडणी म्हणतात). साहित्य-संस्कृतीची चार क्षेत्रे किंवा प्रक्रिया असतात. लेखन, वाचन, आकलन आणि प्रसारण. या प्रत्येक क्षेत्राचा एक कर्ता असतो: अनुक्रमे लेखक, वाचक, समीक्षक (अभ्यासक) आणि प्रकाशक. सोप्या भाषेत म्हणायचे तर लेखक लिहितात, वाचक वाचतात, समीक्षक साहित्याच्या आकलनास मदत करतात आणि प्रकाशक (विक्रेते धरून) साहित्याचा समाजात प्रसार करतात. या सगळ्यांच्या एकमेकांवर होणाऱ्या क्रिया-प्रतिक्रियांनी समाजात साहित्य-संस्कृती वाढते, पसरते. सामाजिक स्थितीचा या चार कर्त्यांवर किंवा प्रक्रियांवर काय परिणाम होतो ते पाहणे म्हणजेच सामाजिक स्थिती आणि साहित्य-संस्कृती यांचा संबंध तपासणे.

**महाराष्ट्रासारख्या देशात समाजाची काय स्थिती आहे?**

'महाराष्ट्र' हे देशातले एक प्रगत राज्य मानले जाते, पण हा दबदबा म्हणजे एक दंतकथा आहे. मुंबई-ठाणे-पुणे पट्ट्यातल्या आणि नाशिक-नागपूर-कोल्हापूर अशा काही शहरांभोवतीच्या औद्योगिक झगमगाटामुळे महाराष्ट्राची ही प्रतिमा तयार झालेली आहे; पण सामाजिक-आर्थिक विकासाचे विविध मापक व दंडक पाहिले तर ही प्रतिमा किती भ्रामक आहे याची कल्पना येईल. राज्याचा जवळजवळ दोन-तृतियांश भाग हा सदोदित दुष्काळाच्या छायेत असतो. लोकसंख्येत शेतीचा हिस्सा कमी कमी होत असला तरी सुमारे ६०% लोकसंख्या ही अजूनही शेतीवर अवलंबून आहे. ही शेती बहुतांशी कोरडवाहू आहे आणि तिची उत्पादकता राष्ट्रीय सरासरीपेक्षाही कमी आहे. जलसिंचनाचे प्रमाण १६% पेक्षा जास्त नाही. लहरी हवामान, भांडवलाचा अभाव आणि बाजारभावांतले शोषण यांमुळे शेतकरी गांजलेला असतो. उद्योगधंद्यांमधल्या गुंतवणुकीचा डांगोरा पिटला जात असला तरी वाहननिर्मिती, माहिती-तंत्रज्ञान आणि सेवाकार्यांची क्षेत्रे सोडली तर इतर उद्योगांत पुरेशी रोजगारनिर्मिती होत नाही. जिल्हानिहाय विषमता आणि विकासाचा अनुशेष अतिशय तीव्र आहे. शहरांतील आणि खेड्यांतील सुमारे ३०% लोक हे अधिकृतरीत्या दारिद्र्यरेषेखाली आहेत. साक्षरतेचे प्रमाण देशाच्या सरासरीपेक्षा जास्त असले तरी समाजातील बराच मोठा हिस्सा अजूनही चांगल्या शिक्षणापासून वंचित आहे. मोठ्या शहरांतील ३० ते ४०% लोकांना गलिच्छ झोपडपट्ट्यांत रहावे लागते. देशातील एकूण एच. आय. व्ही. केसेसपैकी ५०% केसेस २००२ साली महाराष्ट्रात होत्या.

या सगळ्या दर्शकांपेक्षाही खणखणीत दर्शक म्हणजे महाराष्ट्रातील भूक आणि कुपोषण. नोकरदार, सुरक्षित आमदनी असलेल्या वर्गाला कल्पना येणार नाही, पण महाराष्ट्रात



अनुक्रमणिका







भुकेलेल्या लोकांचे प्रमाण लक्षणीय आहे. अलीकडच्या एका अहवालाप्रमाणे महाराष्ट्रातील सुमारे ५६% लोकांना दरडोई दरदिवशी २४०० पेक्षाही कमी कॅलरीज मिळतात तर २२% लोकांना १९०० पेक्षा कमी उष्मांकाचा आहार मिळतो. महाराष्ट्र हे अन्नाच्या दृष्टीने असुरक्षित राज्य आहे. लोकांना मिळणाऱ्या अन्नपुरवठ्याचा एक सर्वंकष निर्देशांक काढला गेला तेव्हा त्यात भारताच्या २५ राज्यांमध्ये महाराष्ट्राची क्रमवारी २३ इतकी खालची होती. मोठ्या प्रमाणावरची भूमिहीनता, लहान आकाराच्या जमिनी, भुसार धान्याची अल्प उत्पादकता आणि मर्यादित वनसंपत्ती या कारणांनी ही परिस्थिती आलेली होती. (स्वामीनाथन रिसर्च फाउंडेशन, २००४:१३९)

भुकेसोबतचाच प्रश्न म्हणजे कुपोषण. मेळघाट किंवा ठाणे जिल्ह्याच्या आदिवासी भागात कुपोषणाने होणाऱ्या मृत्यूच्या बातम्या आपण वाचत असतो; पण कुपोषणाचे हे प्रमाण फक्त दुर्गम, आदिवासी भागातच आहे असे नाही; ते सर्वसाधारण समाजातही आहे. सर्व घटकांतील स्त्रियांमध्ये हे प्रमाण लक्षणीय आहे. १५ ते ४९ या वयोगटातील ५०% हून जास्त विवाहित स्त्रिया अ‍ॅनिमियाने ग्रस्त आहेत.

यासोबतचाच भयंकर प्रश्न म्हणजे बालमृत्यू. सरकार काहीही सांगत असले तरी सरकारी आकडेवारी अत्यंत फसवी आहे. सामाजिक संस्थांच्या संशोधनात असे दिसून आले आहे की, महाराष्ट्र राज्यात दर वर्षी ७० ते ८०% बालमृत्यू हे नोंदलेच जात नाहीत. दरवर्षी सुमारे दोन लाख, बालमृत्यू होत असतात. (ह्या आकड्यांबाबत सध्या वाद आहे, पण तो दीड लाख तरी असावा. दीड लाख असो वा दोन लाख) आकडा गंभीर आहे ही गोष्ट नक्की.) आदिवासी भागात आणि खेड्यातील शेतमजूर व स्थलांतरित कामगारवर्गात हे प्रमाण सर्वाधिक आहे. (बालमृत्यू अभ्यास व कृती गट, २००२)

कुपोषणाचा साहित्य-संस्कृतीशी काय संबंध आहे? खरे तर संस्कृतीचा शारीरिक कुपोषणाशी जेवढा संबंध आहे तेवढा क्वचितच दुसऱ्या कशाशी असेल. सर्वसामान्य माणसालाही हे माहीत असते की मूल लहान असताना झालेल्या कुपोषणाचा थेट परिणाम त्याच्या शारीरिक वाढीसोबतच मेंदूवरही होत असतो. माणसाच्या मेंदूची जास्तीत जास्त झपाट्याने वाढ जन्मल्यापासून अठरा महिन्यांपर्यंतच्या काळात होत असते आणि महाराष्ट्रातील गरीब आणि उपेक्षित वर्गांत कुपोषणाचे प्रमाण याच काळात सर्वाधिक आहे. खरे तर या मुलांचे कुपोषण ते आईच्या पोटात असतानाच सुरू होते. गरोदर स्त्रियांना पुरेसे पोषक अन्न न मिळाल्याने त्यांच्या स्वत:च्या आरोग्यावर तर परिणाम होतोच पण मुलाची वाढही खुंटते. जन्मत:च दुबळी, कमी वजनाची, पूर्ण वाढ न झालेली मुले जन्माला आली तर त्यांचे जगणे पहिल्या दिवसापासून असुरक्षित होत जाते.

मेंदूचे कुपोषण शारीरिक (फिजियॉलॉजिकल) जसे आहे तसेच सामाजिकही. मेंदूच्या सर्व क्षमतांची वाढ व्हावी यासाठी भोवतालचे कौटुंबिक आणि सामूहिक वातावरण संवेदनांनी, उत्तेजनांनी आणि बौद्धिक प्रेरणांनी रसरसलेले असावे लागते. ज्या मुलांभोवती असे वातावरण



अनुक्रमणिका

निर्माण होत नाही, त्यांच्या मानसिक क्षमता पूर्णपणे विकसित होत नाहीत. ज्या घरांमध्ये आई-बाप अशिक्षित आहेत, ज्यांना पोटापाण्यासाठी गावोगांव भटकावे लागते, धोकादायक परिस्थितीत काम करावे लागते किंवा ज्यांचे जीवन कायमच भीती आणि असुरक्षिततेने भरलेले आहे, अशा मुलांच्या मेंदूची संपूर्ण वाढ कशी होणार? बांधकाम कामगार, स्थलांतरित शेतमजूर, ऊस तोडकरी, विटभट्ट्यांवरचे मजूर, रेती काढणारे खलाशी, शहरातील फूटपाथवर राहणारे निर्वासित - समाजातील असा मोठा वर्ग जगण्यासाठी लागणाऱ्या स्वास्थ्यापासून वंचित आहे. मुलांच्या आईबापांना जगण्यासाठी जो संघर्ष करावा लागतो त्यात तर साहित्य - संस्कृतीला जागा असतच नाही, पण मुळातच मेंदूचे शारीरिक व सांस्कृतिक पोषण झाले नाही, तर ही मुले पुढे साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रात कसा सहभाग देणार?

ही गोष्ट केवळ गरीब, उपेक्षित वर्गापुरतीच मर्यादित नाही. पोषण ही गोष्ट आपल्याकडे एकंदरीतच दुर्लक्षित असल्यामुळे मध्यमवर्गातील मुलांचेही योग्य ते पोषण होत नाही. आपल्याकडे साहित्य-संस्कृतीचा व्यवहार खुरटलेला राहतो याचे मुळातले कारण बालपणी मुलांना पौष्टिक खुराक (शारीरिक आणि मानसिक) मिळत नाही हे आहे. अशी मुले साहित्य- संस्कृतीची वाढ कशी करणार आणि तिची क्षितिजे कशी विस्तारणार? यातच टेलिव्हिजनसारख्या साधनांची भर पडलेली आहे. टीव्हीमुळे इंद्रिये उत्तेजित जरी होत असली तरी नवनिर्मितीसाठी आवश्यक असणारे पोषण त्यातून कितपत मिळते, हा वादाचा मुद्दा आहे. टीव्हीच्या परिणामांविषयी जे संशोधन होते आहे त्यातून एक गोष्ट स्पष्टपणे दिसते की सतत टीव्ही पाहण्याने मेंदूला सांस्कृतिक चेतना मिळण्याऐवजी एक प्रकारची मानसिक बधिरताच येते.

कुपोषणाच्या मुद्द्याशी संबंधित मुद्दा गरिबीचा आहे. महाराष्ट्र हा पूर्वापारपासून शेतकऱ्यांचा देश. व्यापाऱ्यांचा किंवा उद्योजकांचा नव्हे. इथली शेती कोरडवाहू. कायम दुष्काळाच्या छायेत. तिच्यातून भांडवलाची वाढ होत नाही. उलट दुष्काळ पडला की जे आहे तेच नाहीसे होते. आजही ही अवस्था फारशी बदललेली नाही. ज्या भागात दुष्काळ पडतो तिथली माणसे तर देशोधडीला लागतातच पण गुन्हेगारीतही हमखास वाढ होते. ह्या दुष्काळाची तीव्रता कमी व्हावी म्हणून रोजगारहमी योजनेतून पाणी साठवण्याची कामे करायला पाहिजेत, पण ते पैसे दुसऱ्याच कामांसाठी वळवले जातात.

उसासारख्या पिकामुळे समृद्धी आल्यासारखे वाटते पण त्या खालचे क्षेत्र तीन टक्क्यांहून जास्त नाही आणि राज्यातले निम्मे जलसिंचन त्यावर खर्ची पडते. बाकीचा भाग कायम तहानलेला राहतो. काही लोकांनी कॅनॉलवर ऊस लावून बलदंड व्हायचे आणि लाखो कोरडवाहू शेतकऱ्यांना 'पाणी पाणी' करायला लावायचे हा तर महाराष्ट्रातला सर्वांत मोठा गुन्हा आहे. हा गुन्हा राजरोस करणारे साखरसम्राट मानभावीपणाने, मोठ्या थाटात साहित्य संमेलने आणि परिषदा भरवत असतात आणि लेखक-कलावंत मंडळीही तिथे मिरवण्यात धन्यता मानत असतात. जी समृद्धी असंस्कृतपणाच्याच नाही तर दुष्टपणाच्या पायावर उभी

आहे, त्यातून काय साहित्य-संस्कृती वाढणार?

शहरी पट्ट्यातल्या औद्योगिकीकरणामुळे राज्याचे एकूण उत्पन्न वाढलेले दिसले तरी त्या उत्पन्नाचे वाटप असमान आहे. राज्याच्या एकूण मिळकतीत मुंबई, ठाणे, पुणे व नागपूर या चार जिल्ह्यांचा वाटा सुमारे ५०% इतका आहे. ठराविक उद्योगातल्या ठराविक माणसांजवळच समृद्धी आहे, मुख्य म्हणजे मराठी माणूस मालक-उद्योजक नसल्यामुळे जो पैसा महाराष्ट्रात आहे तो प्रत्यक्षात मराठी माणसांजवळ नाही.

समाजातील गरिबीचा साहित्य-संस्कृतीवर विपरीत परिणाम होणार ही गोष्ट वेगळी सांगायची आवश्यकता नाही. गरीब आणि कनिष्ठवर्गीय समाज साहित्य-संस्कृतीच्या खेळाचे तिकीट काढूच शकत नाही. दुसरे म्हणजे एकूण समाजच गरीब असल्याने साहित्य-संस्कृतीसाठी जे धन आणि साधनसंपत्ती उपलब्ध करायला पाहिजे ती तो करू शकत नाही. मध्यमवर्गाची विपन्नावस्था संपते आहे, पण या वर्गाला पुस्तकांपेक्षा मनोरंजनाच्या साधनांचा आणि मराठीपेक्षा इंग्रजीचा मोह पडत असल्याने त्याच्याकडून साहित्य-संस्कृतीला जेवढा आश्रय मिळायला पाहिजे तेवढा मिळत नाही.

हा मुद्दा फक्त पुस्तकांच्या खपाशी निगडित नाही, अभिरुचीशीही आहे. मराठी मध्यमवर्गाची अभिरुची ठराविक वर्तुळात घोटाळत राहिलेली आहे. त्यामुळे साहित्यव्यवहाराला मर्यादा पडतात. साहित्य-संस्कृती वाढायची तर समाजाने त्या कार्यासाठी साधनसंपत्ती मोकळी केली पाहिजे. म्हणजे मग त्यातून ग्रंथनिर्मिती होते, भाषांतरे होतात, नवीन संशोधन पुढे येते, वाङ्मयीन प्रयोग केले जातात. तसे होण्यासाठी मुळात महाराष्ट्राच्या आडात पाणी निर्माण झाले पाहिजे म्हणजे ते साहित्य-संस्कृतीच्या पोहऱ्यात येईल.

साधनसंपत्तीच्या अपुरेपणानेच मराठी लेखकांची उपजीविका लेखनावर चालू शकत नाही. त्यांना पोटापाण्यासाठी इतर व्यवसाय करावा लागतो. याचा परिणाम त्यांच्या साहित्यनिष्ठेवर आणि निर्मितिक्षमतेवर होतो. साहित्यबाह्य गोष्टी लेखकांना आपल्या दिशेने खेचत राहातात. लेखन हा व्यवसाय होत नाही, म्हणून मग त्याची भरपाई ही प्रसिद्धी, अधिकार, मानसन्मान, पुरस्कार अशा गोष्टींनी करायची इच्छा होत राहते. त्यातून लेखकाची आत्मनिष्ठा न वाढता दंभ आणि अहंकार मात्र वाढीला लागतो.

साहित्यव्यवहार दरिद्री असल्याने त्यात व्यावसायिकता नाही आणि व्यावसायिकता नाही म्हणून तो व्यवहार आणखीनच खुरटलेला राहतो. कोणत्याही क्षेत्रातली व्यावसायिकता त्या क्षेत्राला शुद्ध आणि गतिमान ठेवायला मदत करत असते. मराठी साहित्यव्यवहार जर व्यावसायिक झाला तर त्याची उलाढाल वाढेल. तो आहे त्यापेक्षा सचोटीचा होईल. मात्र व्यावसायिकता वाढवणे याचा अर्थ भाराभर पुस्तके काढणे आणि वाटेल ते करून ती खपवणे असा नाही. व्यावसायिकता वाढवणे याचा अर्थ आपल्या साहित्यिक आकलनात सतत वाढ करणे आणि व्यावहारिक सचोटीबरोबरच वाङ्मयीन महात्मतेचीही जाण ठेवणे होय.

या संदर्भात सरकारकडून काय अपेक्षा असू शकते? सरकार लोकांकडून कर गोळा



अनुक्रमणिका

करते; पण त्या महसुलाच्या वाटपाचे प्राधान्यक्रम निराळे आहेत. लोकांनी जागृत व्हावे, शहाणे व्हावे असे सरकारला अजिबात वाटत नाही. त्यामुळे वाचनालयांना अनुदान देण्यापेक्षा, सरंजामी पद्धतीने पुरस्कारांची खिरापत वाटण्यात सरकारला (पर्यायाने पुढाऱ्यांना आणि नोकरशहांना) धन्यता वाटत असते. लोकांना पुरस्कार देणे हे सरकारचे खरे तर काम नाही. मध्ययुगात राजे किंवा सरंजामदारच फक्त अशा गोष्टी करत. सरकारला या बाबतीत जर काही करायचेच असेल तर त्याने साहित्य-संस्कृतीसाठी ज्या पायाभूत गोष्टी आहेत- म्हणजे कागदावरचा कर कमी करणे, पुस्तकांना जकात वा तत्सम कर लागू न करणे, शाळांना व ग्रंथालयांना पुस्तक खरेदीसाठी विशेष अनुदान देणे- त्या करायला हव्यात. शासन मराठीच्या वापराबद्दल आग्रही आहे ही एकमेव जमेची बाजू आहे.

या संदर्भातला पुढचा प्रश्न शिक्षणाचा आहे. पूर्वीपेक्षा एकंदरीत शिक्षणाचा पसारा वाढलेला असला तरी अजूनही समाजाचा किती मोठा हिस्सा शिक्षणापासून वंचित आहे याची आपल्याला पुरेशी कल्पना नाही. शाळेपूर्वी बालशिक्षण आवश्यक असते याचे महत्त्व अजूनही पुरेसे पटलेले नाही. शाळांमधून १००% पटनोंदणी होत असली तरी शाळागळतीचे प्रमाण जबरदस्त आहे. सरकारी आकडेवारीप्रमाणे सुमारे ५०% विद्यार्थी हे सातवीच्या पुढे शिकतच नाहीत. पुढे दहावी व बारावीमध्ये चाळणी लागते ती वेगळीच. कॉलेजे आणि विद्यापीठांचा मोठा गवगवा होत असला तरी समाजातील फक्त ५ ते १०% विद्यार्थीच उच्च शिक्षण घेत असतात. शाळागळतीमध्ये आदिवासी, दलित, भटक्या जमाती, शेतमजूर आणि सर्व थरांतील मुली यांचे प्रमाण लक्षणीय आहे. महाराष्ट्र मानव विकास अहवाल २००२ या सरकारी दस्ताऐवजाप्रमाणे महाराष्ट्रातील मुलगे सरासरी ७.४, तर मुली फक्त ४.१ इतकीच वर्षे शाळेत काढतात! (गव्हर्नमेंट ऑफ महाराष्ट्र, २००२:८२). या शिक्षणाचा दर्जा काय आहे हा मुद्दा निराळाच.

सध्या खाजगी कॉलेजांचा महाराष्ट्रात सुळसुळाट झालेला आहे आणि शिक्षणाचा व्यापार करून शिक्षणसम्राट गब्बर झालेले आहेत. महाराष्ट्रातील या कॉलेजांचा फायदा जर खरोखरच इथल्या बहुजनसमाजातल्या, गरीब कोरडवाहू शेतकऱ्यांच्या आणि दलित-भटक्या-आदिवासींच्या मुलांना मिळत असता तर हा व्यापार एकवेळ रास्त मानता आला असता. पण तिथे भर होतेय ती काळा पैसा घेऊन येणाऱ्या धनदांडग्या परप्रांतीयांची. आपल्याच बांधवांच्या पोटावर पाय आणणारे हे शिक्षणसम्राटही साहित्य संमेलने भरवत असतात, पण त्यातून कसली संस्कृती सुधारणार?

समाजातील बहुसंख्य मुलांना जर प्राथमिक शिक्षणच मिळत नसेल, तर त्या समाजात साहित्य-संस्कृतीची अवस्था काय राहील यावर भाष्य करण्याची आवश्यकता नाही. साहित्य-संस्कृतीची जोमदार वाढ होण्यासाठी सर्व मुलांचे निदान दहावीपर्यंतचे शिक्षण तरी चांगले व्हायला हवे. भाषा, भूगोल आणि नागरिकशास्त्र यांच्या भक्कम पायावर हे शिक्षण उभारलेले हवे. साहित्य-संस्कृतीच्या वाढीसाठी, आपली मातृभाषा काय, ती कशी चालते, कशी

वागते, तिची ताकद काय, ती आपल्यासाठी काय करते, आपण तिच्यासाठी काय करतो, याची जाणीव प्रत्येक मुलाला पाहिजे, त्याचबरोबर आपण ज्या भागात, ज्या सृष्टीत, ज्या पर्यावरणात राहतो त्याचेही (म्हणजे 'भू'गोलाचे) ज्ञान पाहिजे. आपल्या भूगोलाशीच आपला इतिहास जोडलेला असतो. सर्वांत महत्त्वाचे खरे तर नागरिकशास्त्र. इतर माणसांबरोबर आपण सभ्यतेने, सौजन्याने आणि सुसंस्कृतपणे कसा व्यवहार केला पाहिजे हे समजणे म्हणजेच संस्कृतीची वाढ होणे. भाषा, भूगोल आणि नागरिकशास्त्र यांचेच दुसरे नाव संस्कृती असे आहे.

अशा तऱ्हेने शिक्षण मुलांना मिळेल असा प्रयत्न दुर्दैवाने आपण करत नाही, आपले शिक्षण हे केवळ सरधोपट आणि पोपटपंची करणारे आहे. मुलांच्या भाषिक क्षमतांची वाढ होईल, भाषिक व्यवहार आनंददायक होईल आणि हे करताना जीवन समजून घेण्याची साधने आणि औजारे त्यांच्या हातांत येतील असा विचार त्यामागे नाही. इंग्रजी माध्यमातून शाळा शिकणे ही तर एक वेगळीच विसंगती आहे. सर्व शिक्षणशास्त्रज्ञ 'मातृभाषेतूनच शिकणे श्रेयस्कर' असे कानीकपाळी ओरडून सांगत असले आणि सर्व प्रगत देशांत स्वत:च्या भाषेतूनच शिकण्याची पद्धत असली तरी इंग्रजी वसाहत आणि अमेरिकन वर्चस्वामुळे आपण इंग्रजीतून शिकायची चूक करत आहोत. ही चूक मराठी साहित्य-संस्कृतीसाठी घातक आहे हे वेगळे सांगायला नको.

चांगले शिक्षण याचाच दुसरा अर्थ भाषेचे चांगले शिक्षण. भाषा हा एक 'विषय' नाही, मार्कस् मिळवण्याचा तर नाहीच नाही; ती जीवन जगायची पद्धत आहे असे आपण आपल्या मुलांना सांगायला पाहिजे. साहित्य-संस्कृती वाढण्याच्या मार्गातली खरी समस्या ही आहे. भाषा ही आपली 'आई' आहे असे आपण नुसते बोलतो. प्रत्यक्षात ती आपली मोलकरीण आहे असा आपला व्यवहार असतो. भाषा हे परस्पर-संवादाचे साधन आहेच, पण ते विचार करण्याचे आणि म्हणून मानसिक उत्क्रांतीचेही साधन आहे. भाषा मजबूत तर माणूस मजबूत आणि माणसे मजबूत तर त्यांची संस्कृती मजबूत.

दारिद्र्य, कुपोषण, निरक्षरता ह्या समस्या कायमच्या आहेत असे नव्हे. त्या नाहीशा होऊ शकतात, नव्हे होतीलही. पण हे काम आपोआप होणारे नाही. त्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करावे लागतात. गरिबी हटवणे हे साहित्य-संस्कृतीच्या अभ्यासकांचे काम जरी नसले तरी आपल्या देशातील गरिबी व विषमतेमुळे आपल्या साहित्य-संस्कृतीवर विपरीत परिणाम होत आहे याचे भान सगळ्यांनी ठेवायला हवे. कुपोषण आणि बालमृत्यू हा फक्त सामाजिक वा आर्थिक काळिमा नाही, तो सांस्कृतिक चट्टा आहे. मातृभाषेतून शिक्षण घेण्याचा मुद्दा तर साहित्य-संस्कृती जगवण्याचाच मुद्दा आहे.

आपल्या सामाजिक स्थितीचे एक प्रमुख अंग म्हणजे जातिव्यवस्था. ती अर्थातच सर्व भारतभर आहे आणि भारतातल्या सर्व सांस्कृतिक व्यवहारावर तिचे सावट पडते. आपल्याकडच्या विषमतेचेच दुसरे नाव जातिव्यवस्था, पण आर्थिक विषमतेपेक्षा ती जास्त भीषण आहे कारण

ती जन्माशी निगडित आहे. त्यात व्यक्तीला निवडीचे स्वातंत्र्य नाही. दुसरे म्हणजे त्यात 'दर्जा' ही संकल्पना आहे. त्यामुळे साहजिकच 'वरचे' आणि 'खालचे' असा भेद तयार होतो. अस्पृश्यतेच्या कल्पनेने तर तिला कायमचाच काळिमा लागलेला आहे. सर्वांत दुर्दैवाची गोष्ट म्हणजे खालच्या मानल्या जाणाऱ्या जातींना परंपरेने, शिक्षणाची तर सोडाच पण साक्षरतेचीही ओळख करून दिली जात नसे. त्यामुळे समाजातील एक मोठा वर्ग लिहिण्या-वाचण्यापासून वंचित ठेवला गेला. आपल्या समाजाच्या चिरफळ्या होऊन तो विकलांग झाला, याला जातिव्यवस्थाच प्रामुख्याने कारणीभूत आहे.

जातिव्यवस्थेचा पगडा आता कमी कमी होत असला तरी आपण अजूनही आपापल्या जातीतच लग्ने करत असल्यामुळे ती पूर्णपणे मोडकळीला आलेली नाही. मुख्य म्हणजे आपल्या मनातून ती अद्याप गेलेली नाही.. संकुचित राजकारणामुळे तर तिला आणखीनच उत्तेजन मिळते आहे. अजूनही माणसाची पारख वा चौकशी करताना आपल्या मनात जातीचा संदर्भ असतोच. 'जातीपायी खावी माती' हे आपल्या समाजाचे ब्रीद. आपल्याकडचा सगळा सामाजिक कोतेपणा, सगळे कार्पण्य, सगळ्या हिणकस प्रवृत्ती या जातिव्यवस्थेतून निर्माण झाल्या आहेत.

जातिवास्तवाचा लेखकावर काय परिणाम होतो? जातिवास्तव लेखकाची अभिव्यक्ती संकुचित करते. स्वत:च्या जातीविषयी किंवा जातिबांधवांविषयी लिहिणे अवघड असते. दुसऱ्याच्या जातीविषयी लिहिणे तर अशक्यच. मोठ्या शहरांत राहणाऱ्या लेखकांना ही अडचण जाणवणार नाही; पण लहान गावात आणि स्वत:च्या समूहाबरोबर राहणाऱ्यांना ही गोष्ट कायम भेडसावत राहते. जात म्हणजे विस्तारित नातेसंबंध. त्यामुळे जातीतले लोक हे स्वत:चे नातलगच असतात. दलित किंवा भटक्या समाजातील लेखकांना या बाबतीत झालेला त्रास सगळ्यांना माहीत आहेच. लेखनात येणारे जातीचे संदर्भ स्फोटक होऊ शकतात. जातिवास्तव हिंदुस्थानी माणसाचे जगणे नियंत्रित करत असते. ती इथल्या माणसाचे व्यक्तिमत्त्व ठरवते पण त्याविषयी खुलेपणाने लिहिता येत नाही.

याशिवाय साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रातला जातिव्यवस्थेचा परिणाम दोन तऱ्हेचा आहे. पहिला म्हणजे या क्षेत्राला आलेला पांगळेपणा. समाजातला एक मोठा हिस्सा साक्षरतेपासून आणि लिहिण्या-वाचण्यापासून दूर राहिल्यामुळे त्या समाजाचा जीवनानुभव साहित्यात येऊ शकला नाही. त्यामुळे मराठी साहित्य एकांगी राहिले. काही प्रमाणात दलित साहित्याने ही उणीव भरून काढली, पण अजूनही समाजातले अनेक घटक (आदिवासी, भटके-विमुक्त, शेतकरी-शेतमजूर, बलुतेदार, मच्छीमार, पशुपालक, शहरी निर्वासित इत्यादी) असे आहेत की ज्यांचा अनुभव साहित्यात आलेला नाही. इथे अनुभव म्हणजे आत्मचित्रण असा अर्थ नाही. आत्मकथनांनी त्या समाजाची स्थिती काय आहे, याची कल्पना मराठी साहित्याला आली.. आता जी गरज आहे ती आत्मचित्रणाच्या पलीकडे जाऊन 'जीवन कसे समजून घेतले?' ते सांगण्याची. आपल्याकडे निरनिराळ्या समूहांच्या (आणि म्हणून व्यक्तींच्या)



अनुक्रमणिका







जगण्यात प्रचंड विविधता आहे, त्यातून जगण्याचे विविध दृष्टिकोन संभवतात आणि ते सगळे दृष्टिकोन, सगळी जीवनदृष्टी (इंग्रजीत वर्ल्ड व्ह्यू) साहित्य-संस्कृतीला समृद्धी आणू शकते. आपल्याकडे ते अद्याप झालेले नाही.

जातिव्यवस्थेचा दुसरा वाईट परिणाम म्हणजे साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रातही आलेला जातीयवाद. हा उघडपणे दिसतो तसाच लपूनछपूनही. सुरुवातीला त्याची मिरासदारी ब्राह्मणवर्गाकडे होती पण आता हे लोण बहुजनसमाजातही पसरले आहे. जातिव्यवस्थेचे प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे 'आपला' आणि 'तुपला' हा भेद. हा भेदभाव साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रात आता ठाण मांडून बसला आहे. त्यामुळे साहित्यिक वातावरण तर प्रदूषित होतेच पण साहित्यिक आकलन आणि समीक्षाही संकुचित होते.

जातिभेदासोबतची सामाजिक समस्या म्हणजे लिंगभेदभाव (इंग्रजीत 'जेंडर डिस्क्रिमिनेशन'*) आपल्या समाजामध्ये स्त्रीला दुय्यम स्थान आहे ही गोष्ट वेगळी सांगायची आवश्यकता नाही. कायद्याने स्त्री-पुरुष समानता मानली गेली असली तरी शिक्षण, मालमत्तेवरचा हक्क, घरातले स्वातंत्र्य, नोकऱ्या, अधिकाराच्या जागा, सत्ता इत्यादी बाबतीत स्त्रियांना दुय्यमपणाची वागणूक मिळत असते. पारंपरिक भारतीय मनाला स्त्रीचे स्थान हे घरातच आहे आणि कुटुंबाची सेवा हेच तिचे जीवितकार्य आहे असे वाटते. या भावनेचा पगडा स्त्रियांवरही असतो. स्त्रियांकडे पाहण्याची दुटप्पी आणि पाखंडी वृत्ती हेही आपल्या समाजव्यवस्थेचे एक वैशिष्ट्य आहे. एका बाजूने स्त्रीच्या देवीस्वरूपाचा गौरव करायचा आणि दुसऱ्या बाजूने तिचे सर्व तऱ्हेने शोषण करायचे हा आतापर्यंतचा समाजधर्म होता. 'माणूस' म्हणून वा एक स्वतंत्र व्यक्ती म्हणून स्त्रीचा विचार झाला पाहिजे, हा विचार अगदी अलीकडच्या काळात आलेला आहे.

लिंगभेदभावाचा थेट परिणाम म्हणजे स्त्रियांच्या वाट्याला येणारे कष्ट आणि त्यांची वंचितावस्था. पण त्याहीपेक्षा भीषण गोष्ट म्हणजे स्त्रियांचे अस्तित्वच हरवून जाणे. नैसर्गिक नियमाप्रमाणे १००० पुरुषांमध्ये १०५० स्त्रिया असायला हव्यात. आपल्याकडे काय स्थिती आहे? महाराष्ट्र मानव विकास अहवाल २००२ या सरकारी दस्ताऐवजातच नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्रात १९९१ साली हे प्रमाण ९३४ होते तर २००१ साली ते ९२२ इतके कमी झाले. या हिशेबाने २००१ साली महाराष्ट्राच्या लोकसंख्येमध्ये चाळीस लाख स्त्रिया नाहीशा झालेल्या होत्या! स्त्रियांना होणाऱ्या कौटुंबिक छळाच्या बाबतीत महाराष्ट्राचा क्रमांक देशात पहिला आहे, तर स्त्री-अत्याचाराबाबत कुप्रसिद्ध राज्यांच्या यादीत महाराष्ट्राचा

* सध्या इंग्रजीत 'जेंडर' या संज्ञेची चलती आहे. पण त्याचा नक्की अर्थ मराठी बोलणाऱ्यांना जसा समजत नाही तसा इंग्रजी बोलणाऱ्यांनाही समजत नाही. बहुतेक लोक 'सेक्स' शब्दाला समानार्थी म्हणून जेंडरचा उपयोग करतात. पण ते योग्य नाही. सेक्स म्हणजे लिंग तर जेंडर म्हणजे लिंगभाव. लिंग ही जीवशास्त्रीय संज्ञा आहे तर लिंगभाव ही समाजशास्त्रीय. स्त्री-पुरुषांमध्ये लैंगिक फरक आहेच. त्या फरकाकडे पाहण्याचा सामाजिक दृष्टिकोन म्हणजे लिंगभाव.

क्रमांक (राजस्थान, मध्यप्रदेश व दिल्ली नंतर) चौथा आहे. (गर्व्हमेंट ऑफ महाराष्ट्र, २००२: ९८-१०९).

ग्रामीण असो, शहरी असो वा आदिवासी; बहुसंख्य स्त्रिया अतिश्रमाने गांजलेल्या असतात. स्वत:च्या शरीरावर, श्रमावर, वेळावर आणि पैशावर त्यांची मालकी नसते. त्यामुळे नवीन साहित्य निर्माण तर सोडाच पण साहित्य-संस्कृतीचा आस्वाद घेण्याइतकीही फुरसद त्यांना मिळत नाही. मनोरंजनाची टीव्हीसारखी साधने उपलब्ध होतात, पण पुस्तके वाचणे दुरापास्त होते. साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रात ठराविक वर्गातल्याच स्त्रिया दिसतात याचे कारण हेच आहे.

ज्या स्त्रिया सहभागी होतात त्यांनाही या क्षेत्रात दुय्यमच स्थान मिळते. स्त्रियांनी केलेली कोणतीही गोष्ट ही बिनमहत्त्वाचीच असते असा लिंगभेदभावाचा परिणाम होत असतो. त्यामुळे स्त्रियांनी लिहिलेले साहित्य हे 'बायकी' आणि म्हणून दुय्यम, क्षुल्लक आणि गंभीरपणे न घेण्याजोगे आहे अशी भावना साहित्यिक व्यवहारातही पसरलेली आहे. मुख्य म्हणजे साहित्यिक महात्मता ठरवण्याचे वा समीक्षेचे दंडक हे पुरुषांनी ठरवलेले आहेत. त्यामुळे स्त्रियांच्या साहित्यकृतींचा आस्वाद घेण्यासाठी व आकलन करण्यासाठी जी संवेदनशीलता पाहिजे ती साहित्यव्यवहारात विकसित झालेली नाही.

या संदर्भातील दुसरी गोष्ट म्हणजे, आपल्याकडचा साहित्यव्यवहार, विशेषत: त्यातील निर्णयप्रक्रिया ही पुरुषकेंद्रित झालेली आहे. या गोष्टींची सत्यता पाहायची असेल तर साहित्य संमेलनांच्या अध्यक्षपदी किती स्त्रियांची निवड झाली आहे तो आकडा बघावा. गेल्या ७७ वर्षांमध्ये फक्त चार स्त्रियांना हा मान मिळालेला आहे. (५%)! हा आकडा पाहिल्यावर साहित्यिक लिंगभेदभावावर अधिक भाष्य करण्याची गरज नाही. पुढील सलग वीस वर्षे जरी स्त्रिया संमेलनाध्यक्ष झाल्या तरी हा अनुशेष भरून येणार नाही.

पण लिंगभेदभावाचा खरा परिणाम होतो तो स्त्री-पुरुष लेखकांच्या मानसिक घडणीवर. लिंगभेदभावामुळे स्त्री-पुरुषांचे स्वभाव, वागणूक, भावना, आकांक्षा, त्यांच्या समाजातल्या भूमिका, कर्तव्ये इत्यादींविषयी मनात साचेबंद प्रतिमा आणि समजुती तयार होतात (इंग्रजीत स्टिरिओटाइप्स). अमुक एका प्रसंगात स्त्री वा पुरुष कसे वागतील, त्यावेळी तिच्या/त्याच्या भावना कशा असतील, त्यांच्या आकांक्षा काय असतील ह्याची समज ही लिंगभावाने नियंत्रित झालेली असते. लिंगभावाची जी शिकवण त्या लेखक-लेखिकेला मिळालेली असेल त्याप्रमाणे त्याचे/तिचे स्त्री-पुरुष संबंधाचे आकलन होईल व त्यानुसार लेखन होईल. मनात लिंगभेदभाव असेल तर तो लेखनातही येणारच. त्यामुळे त्या लेखनाला मर्यादा पडू शकते. स्त्री-पुरुषांच्या स्वभावाबद्दल आणि वागणुकीबद्दल चुकीचे निष्कर्ष काढले जाऊ शकतात. हे फार अबोध पातळीवर होते. त्यामुळे चटकन लक्षात येत नाही. फारच थोडे लेखक-लेखिका लिंगभावाच्या मर्यादा उल्लंघून जाऊ शकतात. सामाजिक स्थितीचा लेखनावर, पर्यायाने साहित्य-संस्कृतीवर कसा परिणाम होऊ शकतो याचे हे उत्तम उदाहरण आहे.



अनुक्रमणिका

हे सर्व विवेचन करत असताना एक गोष्ट मात्र नमूद करून ठेवली पाहिजे की, आर्थिक विकासाच्या बाबतीत महाराष्ट्र हे देशातले एक प्रगत राज्य आहे हे जरी मिथ्थक असले तरी सामाजिक सुधारणेच्या बाबतीत महाराष्ट्राची स्थिती देशातल्या बहुसंख्य राज्यांपेक्षा उजवी आहे. ब्रिटिशांचा अंमल सुरू झाल्या झाल्या इथे सामाजिक सुधारणेची चळवळ सुरू झाली आणि तेव्हापासून ती थांबलेली नाही. त्यामुळे स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण, जातिभेदनिरास, अंधश्रद्धानिर्मूलन, धर्मनिरपेक्षता, विवेकवाद, स्त्रीमुक्ती, स्वयंसेवी सामाजिक कार्य, व्यक्तिस्वातंत्र्याची चाड, वाङ्मयीन प्रयोगशीलता आणि साहित्यिक व वैचारिक आधुनिकता अशा बाबतीत महाराष्ट्राचे पाऊल देशातल्या इतर राज्यांपेक्षा पुढे आहे. दलित साहित्य हे त्याचे उत्तम उदाहरण. ते तसे आहे म्हणूनच कोरडवाहू दुष्काळी प्रदेश असला, शहरात झोपडपट्ट्या असल्या आणि आर्थिक दारिद्र्य असले तरी इथली साहित्य-संस्कृती जिवंत आहे. तिच्या भवितव्याविषयी लोकांना चिंता वाटते, ती अधिक भरभराटीला कशी येईल, याचा विचार केला जातो.

इथे आपण सामाजिक स्थिती असा उल्लेख जरी करत असलो तरी त्यामध्ये सामाजिक गती म्हणजे सामाजिक बदलांची प्रक्रियाही सामील आहे. समाजामध्ये जे बदल होत असतात त्यांचा परिणाम साहित्य-संस्कृतीवर होणे साहजिकच असते. किंबहुना संस्कृती या शब्दामध्येच बदल किंवा परिवर्तन दडलेले आहे. 'जी बदलत राहते म्हणजेच संस्कारित होत राहते ती संस्कृती,' अशी जरी संस्कृतीची व्याख्या केली तरी ती चुकीची होणार नाही.

**सध्या आपल्या समाजात कोणकोणते महत्त्वाचे बदल होत आहेत?**

सर्वांत मोठा आणि जाणवणारा बदल म्हणजे आपल्या समाजाचे शहरीकरण होत आहे. आजमितीस महाराष्ट्राची सुमारे चाळीस टक्के लोकसंख्या शहरात राहते. पुढच्या पन्नास वर्षांत ती जवळ जवळ संपूर्णपणे शहरात राहू लागेल अशी चिन्हे दिसत आहेत. याचा अर्थ सगळे लोक मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक अशा मोठ्या शहरांत येऊन राहू लागतील असे नाही. मोठी शहरे अजून मोठी होतीलच पण आज जी लहान गावे वा तालुक्याची ठिकाणे आहेत त्यांचे रूपांतर शहरात होईल. 'शहरी' भाग म्हणून ठरवण्याचे जे निकष आहेत त्यानुसार ह्या गावांना शहर मानले जाईल. त्यातला मुख्य निकष असा की लोकांचे शेतावरील अवलंबन कमी होऊन बिगरशेती व्यवसायांची वाढ होईल.

ह्या प्रक्रियेचा स्वाभाविक परिणाम म्हणजे साहित्य-संस्कृती ही नागर संस्कृती होईल. शिक्षित लोक हे सर्व शहरात राहायला येतील. आपल्या समाजाची ग्रामीण मानसिक घडण पूर्णपणे गेली नाही तरी लोकांची जीवनशैली झपाट्याने शहरी होत जाईल.

संस्कृतीच्या संदर्भात याचे दोन परस्परविरोधी परिणाम संभवतात. एक म्हणजे शहरातील वातावरण हे खेड्यांपेक्षा अधिक खुले, अधिक प्रगल्भ, अधिक व्यक्तिस्वातंत्र्यवादी असल्याने साहित्यसंस्कृतीच्या वाढीसाठी पोषक असते. शहरात लेखकांच्या कलाविष्कारावर कमी बंधने पडतात. शहराच्या आधुनिक, जागतिक आणि गतिमान वातावरणामुळे साहित्यात

नवनवीन कल्पना आणि शैली येऊ शकतात. सर्वांची संस्कृती समान झाल्याने सांस्कृतिक आकलन सुधारते. आज शहरातील लेखकांनी केलेले आधुनिक मनोव्यापारांचे चित्रण खेड्यातल्या माणसांना परके वाटण्याचा संभव असतो. सगळ्यांचीच जीवनपद्धती आणि सांस्कृतिक ठेवा समान झाला की साहित्यिक आकलन अधिक सुलभ होते. विशेषत: साहित्यिक समीक्षा, जी आज दुर्बोध आणि परकी वाटते, ती समजायला सोपी होऊ शकते. तिचे कायदेकानून सर्वांपर्यंत पोहोचू शकतात. साहित्यिक आकलनामधला विरोध आणि विसंवाद कमी होतो.

पण याच्या उलट होणारा परिणाम म्हणजे साहित्य-संस्कृतीमधली विविधताही नष्ट वा कमी कमी होत जाऊ शकते. शहरी संस्कृतीचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे एकसारखेपणा. शहराची रचना ही जगण्याच्या समान सूत्रांवर, समान भौतिक साधनसुविधांवर आणि म्हणून समान आकांक्षांवर होत असते. थोडक्यात, जगण्याची पद्धत एकसारखी होत जाते. समाजात विषमता जरी राहिली आणि उच्च, मध्यम, कनिष्ठ, गरीब, अतिगरीब असे वर्ग जरी तयार झाले तरी शहरी भौतिक व सामाजिक वातावरण एकसारखे असल्याने हळूहळू माणसांची मने एकसारखी विचार करायला लागतात. साहित्य-संस्कृतीत आज जी विविधता दिसते ती जगण्याच्या पद्धतींमधली विविधता आहे. जगणे एकसारखे, एकसुरी झाले की सांस्कृतिक विविधता नाहीशी होते. आज लोक विविध पर्यावरणात, विविध धंदे-व्यवसाय करत, विविध नातेसंबंधांनी जगतात म्हणून साहित्य-संस्कृती सर्वांगांनी भरभरून फुलू शकते. सगळेच एकदा शहरी चाकरमाने झाले की हे वैविध्य नष्ट होण्याचा धोका आहे.

सध्या जी जागतिकीकरणाची प्रक्रिया घडते आहे त्यामुळे तर हा एकसुरीकरणाचा धोका अधिक वाढला आहे. जागतिकीकरणाचे फायदे अनेक होतील. लोक एकमेकांच्या जवळ येऊ लागतील, इकडच्या शेतमालाला जागतिक बाजारपेठ मिळेल, तरुणांना कॉम्प्युटरच्या क्षेत्रातल्या नोकऱ्या मिळतील, परदेशप्रवास सुलभ होईल, इत्यादी. पण सगळे जग एकसारखे होण्याचा धोकाही त्यामध्ये आहे. हे एकसारखेपण केवळ कपडे, कार्स, कॉम्प्युटर, खेळणी, खाणेपिणे इत्यादींबाबतच न राहता भाषा, धर्म, विचार, मानसिकता या बाबतीतलेही आहे आणि ते जास्त धोक्याचे आहे. जगातली सगळी माणसे एकच भाषा बोलू लागली, एकच अन्न खाऊ लागली, एकाच तऱ्हेने विचार करू लागली तर ती गोष्ट कोणत्याही साहित्य - संस्कृतीसाठी लाभदायक नाही. भारतासारख्या देशात तर नाहीच नाही.

याचा अर्थ जे लोक आज खेड्यापाड्यांत जगतात त्यांनी तसेच जगावे असा नाही. याचा अर्थ असा की प्रगत वा आधुनिक जीवनाने माणसांमाणसांतला दुरावा मिटवावा, पण जगण्याच्या शैलींमधली विविधता कायम ठेवावी, नव्हे अजून वाढवावी. महानगरात राहणे म्हणजेच आधुनिक असणे असे नव्हे. आधुनिकता म्हणजे जगण्याचे विविध पर्याय खुले असणे. एकसारखेपणाने जीवन नीरस आणि कंटाळवाणे तर होतेच, पण एखाद्या आपत्तीने ते एकाच सपाट्यात नाहीसे होण्याचा धोकाही वाढतो. गेल्या लक्षावधी वर्षांत मानवी जीवनाचे रक्षण आणि संवर्धन झाले ते त्यातील विविधतेमुळे. विविधतेत जगण्याचा आनंद



अनुक्रमणिका







# आंतरराष्ट्रीय अहिराणी बोलीभाषा



डॉ. बापूराव देसाई

मराठीतील पहिले ज्ञानपीठ पुरस्कार साहित्यिक- वि. स. खांडेकर यांनी एके ठिकाणी असे म्हटले आहे की– 'अहिराणी केवळ बोलीभाषा आहे; लेखानाची नाही' असो, हे जरी त्यांनी म्हटले परंतु परिस्थिती तशी नाही. काळाने सिद्ध करून दिले की, अहिराणी केवळ बोलीभाषा नसून ती लेखनाची पण भाषा आहे. अहिराणीतील प्रकाशित विपुल साहित्यावरून आपल्या लगेच लक्षात येईल.

अहिराणी ही उत्तर महाराष्ट्रातील नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगाव जिल्ह्यांत बोलली जाणारी ही एक आर्यबोली होय. हिला मराठीची पोटभाषा म्हणून समजली जाते. डॉ. ग्रिअर्सनच्या मते ती एक भिल्ली बोली असून त्याने लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडियाच्या नवव्या खंडाच्या तिसऱ्या भागात इतर भिल्ली बोलीबरोबर ती दिली आहे. अहिराणी ही मराठीशी, तर काही बाबतीत गुजराथीशी मिळतीजुळती आहे. हिची काही वैशिष्ट्ये पूर्णपणे भिन्न आहेत.

तशा प्रत्येक भाषेत अनेक बोली असतात. महाराष्ट्रातही नागपुरी, वऱ्हाडी, कोल्हापुरी, मराठवाडी अशा अनेक बोली आहेत. आपल्या अहिराणी संदर्भात म. रा. साहित्य आणि संस्कृती मंडळाचे पूर्व अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी म्हटले आहे की,– 'या बोलीत अनेक गुजराथी व मराठी शब्दांची सरमिसळ झालेली आहे. नादमधुर अशी ही अहिराणी बोली महाराष्ट्राच्या इतर भागांतील सामान्य सुशिक्षित माणसाला कळण्याला कठीण. अहिराणी बोलीत फार मोठे साहित्य सामावले आहे. अहिराणीतील गीत आणि ओव्या मानवी भावनांना सहजपणे आकार देतात. त्यात आलेले सामाजिक चित्रण तिथल्या समाजांचे मूर्तिमंत चित्रच उभे करू शकते. खानदेशातील सारी वैशिष्ट्ये-सण, उत्सवापासून तर कौटुंबिक वात्सल्यापर्यंत अहिराणी बोलीत प्रगट होतात.'

अशा अहिराणीच्या अपेक्षा व उपेक्षा संदर्भात आनंदीबाई शिर्के म्हणतात– 'तापी थडीवरील अलिखित अहिराणी साहित्याकडे अहिराणी साहित्यसेवकांनी लक्ष पुरवावे. अहिराणी लोकसाहित्य क्षेत्र खऱ्या अर्थाने दुर्लक्षित आहे. त्यासाठी विशेषत: खानदेशातील संशोधकांनी व अहिराणी भाषाभिमान्यांनी लक्ष पुरवावे.'



अनुक्रमणिका








'अहिरांची वा आभिरांची वाणी ती अहिराणी' हे मत जवळ जवळ सर्व संशोधकांनी मान्य केले आहे. आभीर समाज, त्यांचा इतिहास, संस्कृती, परंपरा लक्षात घेतली तर अहिराणी ही मराठीपेक्षा प्राचीन ठरते, ही इतिहाससिद्ध गोष्ट होय. प्रमाणभाषा ही बोलीभाषांतून निर्माण होते, हा भाषा-विज्ञानाचा मूलभूत सिद्धांत आहे. मराठी भाषा बोलीभाषा म्हणून ७ व्या, ८ व्या शतकात दिसून येते. दहाव्या शतकात ती लेखनात आली आणि १३ व्या शतकात ती ग्रांथिक रूपात दिसू लागते. अहिराणी बोली ही त्याआधी कितीतरी शतके अस्तित्वात होती. मराठी, कानडी, पारसी, अरबी, हिंदी, इंग्रजी या भाषांच्या संपर्कात येऊनही ती आज पण उपेक्षित बोली म्हणून प्रचलित आहे. अशा अहिराणी संदर्भात संशोधकांची वेगवेगळी मते आहेत. श्री. भा. र. कुळकर्णी तर असे म्हणतात–

'अहिराणी ही आर्यवर्गातील एका टोळीची संस्कृतपूर्व अशी परंपरागत चालत आलेली कमी-अधिक संस्कार झालेली भाषा दिसते. ती मराठीची पोटभाषा नाही अन् गुजराथीची तर नाहीच नाही.'

डॉ. केतकर संपादित 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'त असे म्हटले आहे. 'खानदेशी अथवा अहिराणी भाषा जरी गुजराथी किंवा मराठीसारखी दिसत असली तरी ती मागधी, सौराष्ट्री, शौरसेनी, महाराष्ट्री, पैशाची इ. प्राकृत भाषांपासूनच निघाली आहे.'

अहिराणी बोलीच्या उगमाविषयी चर्चा करताना बहुचर्चित संशोधक चांदोरकर पां. मा. असे म्हणतात की, 'आभिरीभाषा व आताची अहिराणी यांमध्ये फारच अंतर असणे स्वाभाविक आहे' तर 'महाराष्ट्री लोप पावल्यानंतर शके १५० ते ४०० पर्यंत ज्या अपभ्रष्ट भाषा प्रचारात होत्या त्या काळीच अहिराणी भाषेचा उद्भव झाला' असे कै. राजवाड्यांचे मत आहे. आजच्या अहिराणीवर अर्धमागधीप्रमाणे इतर प्राकृत भाषांचाही परिणाम झाला आहे. प्राकृत भाषा ही अहिराणीची पूरक व पोषक भाषा होय.

अहिराणी बोलीचे एक व्यासंगी संशोधक डॉ. दा. गो. बोरसे हे अहिराणी बोली ही स्वतंत्र बोली मानून अपभ्रशांचे पूर्वरूप असल्याचे सांगतात. बोलीभाषेच्या संदर्भात सध्याची स्थिती पाहता औद्योगिक विकास, दळणवळणाचे जाळे, प्रसार माध्यमांत इंग्रजीचे अनाठायी, अवाजवी महत्त्व, शिक्षण व इतर क्षेत्रांत वाढलेले इंग्रजांचे स्तोम यामुळे या बोली भाषा-विशेषत: पावरा, भिल्ली, वंजारी, गुजरी, अहिराणीतील लोकसाहित्य लोप पावत आहे. सुशिक्षित माणसांचा व्यवहार सर्रास विदेशी भाषेतून होऊ लागला आहे. आता तर पर्यटनामुळे जपानी, फ्रेंच, रशियन इ. भाषेकडे बरेच लोक वळताहेत. हल्ली शहरी व ग्रामीण भागात सुद्धा बोलीभाषेत बोलणं हे कमीपणाचे, गावंढळपणाचे लक्षण मानले जात आहे. ही विकृती कमी होणे ही आजच्या काळाजी गरज आहे.

'अहिराणी' ही खानदेशात जास्त बोलली जाते. या बोलीचा भौगोलिक परिचय करून द्यायचा झाल्यास महाराष्ट्रातील जळगाव या नावापूर्वी याला पूर्व खानदेश म्हणत. इ.स. १९०६ पासून 'खानदेश' या जिल्ह्याचे पूर्व खानदेश (जळगाव) व पश्चिम खानदेश (धुळे) असे दोन

स्वतंत्र विभाग करण्यात आले. याविषयी जळगाव जिल्हा गॅझेट मध्ये आलेली माहिती :

'खानदेश हे ऐतिहासिक नाव असून पूर्वी खानदेश सुभा अस्तित्वात होता. खानदेश सुभ्याला खानदेश जिल्हा असे नाव पडले असावे. खानदेश नावाच्या व्युत्पत्तीबाबत एकमत आढळत नाही. काही लेखकांच्या मते पांडवकालीन खांडववन म्हणजे खानदेश, काही लेखक, अश्कम, स्कंधदेश, खांडवदेश, कान्हदेश अशी व्युत्पत्ती देतात. रामायण, महाभारतकालीन ऋषीक प्रदेश म्हणजे खानदेश असाही एक विचार मांडण्यात आलेला आहे. कान्हदेश हे नाव कृष्णावरून पडले असावे असे म्हटले जाते.' **(जळगाव जिल्हा गॅझेट– सं. डॉ. कि. का. चौधरी, पृष्ठ १)**

**प्रस्तुत जिल्हा गॅझेटमध्ये अहिर लोकसमूह व अहिराणी भाषा यांविषयी आलेली माहिती पुढीलप्रमाणे–**

''इसवी सनाच्या तिसऱ्या शतकात आभीर लोक सध्याच्या खानदेशात येऊन स्थायिक झालेले असावेत. अनहिलवाड येथील चालुक्य राजाने अवंती देश जिंकल्यावर रेवा म्हणजे नर्मदा नदी ओलांडून आभिरांचा प्रदेश जिंकून घेतला. त्यावरून अनहिलवाडांच्या चालुक्य राजवटीआधी आभिरांची राजवट खानदेशाच्या काही भागांत असावी. चौदाव्या शतकात देखील आभीर लोकांची एक मोठी तुकडी खानदेशात आल्याचे दिसते. खानदेशावर वाकाटक, बदामींचे चालुक्य, सेंद्रक, कलचुरी, सरष्ट्रकूट व यादवांची सार्वभौम सत्ता असतानाही खानदेशचे प्रत्यक्ष अधिपती होते आभीर. आभिरापासून 'अहीर' असा अपभ्रंश होऊन या लोकांना अहीर हे नाव प्राप्त झाले आहे. आजही खानदेशातील काही भागात अहीर ब्राह्मण, अहीर सोनार, अहीर शिंपी, अहीर कुणबी अशा जाती आढळतात. यावरून हे सर्व लोक प्राचीन काळी अहीर असून चातुर्वर्णाप्रमाणे त्यांच्या विविध जाती निर्माण झालेल्या असाव्यात. अहीर जनसमूहाची वाणी म्हणजेच अहिराणी. उगम काळापासून अलीकडील काळापर्यंत अहिराणी ही बोलीभाषेच्या स्वरूपात टिकून राहिली आहे.'' **(जळगाव जिल्हा गॅझेट, स. डॉ. कि. का. चौधरी, पृष्ठ ७३८)**

प्रत्येकाला जगात माय (आई) व मायबोली इतर कोणत्याही गोष्टींपेक्षा जीवापाड आवडते. मग ती कुणाची पण कोणती का बोली असेना. त्यांतल्या त्यात अहिराणी ही आर्योद्भव भाषा होय. तिच्यातील लिध, दिध, किध ही रूपे शौरसेनी वळणावर आहेत. हिचे पूर्वीचे नाव 'आभीरी' अशी संशोधकांनी भाषाशास्त्रात नोंद केलेली आहे. काही भाषासंशोधक आर्यांना यादववंशीय मानतात. गुरे चारणे, शेती करणे हाच त्यांचा मुख्य व्यवसाय होता. शक, हूण इत्यादींच्या स्वाऱ्यांमुळे ते पंजाब, सिंध, मारवाड, माळवा, मध्यभारत, गुजरात, नाशिक, कोकण, खानदेश अशा अनेकविध प्रदेशांत विखुरले गेले असे इतिहास कथन करतो.

ज्यांची मातृभाषा अहिराणी नाही, तसेच ज्यांनी ह्या भाषेचा - बोलीचा भाषाशास्त्रीयदृष्ट्या अभ्यास न करता अनेकानेक निष्कर्ष काढले आहेत अन् त्या निष्कर्षावरून हल्ली अनेक प्राध्यापक - शिक्षक अहिराणीबद्दल तसे बोलत असतात– उदाहरणार्थ अहिराणी ही मराठीची बोली आहे!











मग आज मराठीत कितीतरी शब्द अरबी, फारसी, उर्दू व इंग्रजी भाषेतील शब्द सराईतपणे वापरले जात आहेत. गवर, हैवान, राजी इ. अरबी शब्द अलवार, तोफांडी, बिमारी, आसामी इ, फारसी शब्द. आफिस, कंडक्टर, केस, गल्लास, जंगल, डाकटर इत्यादी इंग्रजी शब्द. वरील अनेक शब्द अहिराणी बोलीभाषेत इतके मिसळले की ती रूपे आता परकीय वाटत नाहीत. मग आता पारसी, इंग्रजी यांना अहिरणीच्या पोटभाषा समजाव्यात काय?

अहिराणी ही इतकी जुनी भाषा आहे की, तिच्यातील काही शब्दांची उत्पत्ती भाषाशास्त्रज्ञांना, विद्वानांना आजही लागत नाही. मराठी, गुजराती, संस्कृतमध्ये त्यांचा संदर्भ लागत नाही. त्यांचा मूळ धातू सापडत नाही. उदा. आंडोर-आंडेर (मुलगा-मुलगी), इबाक-तिबाक (इकडे-तिकडे), त्येन मिचुक (त्याशिवाय), आखो (आणखी), धंडेल (शेवटचा) इत्यादी. तेव्हा वाद-विवाद, संघर्ष करण्यापेक्षा अभ्यासाने याचा शोध घेणे जरुरीचे आहे.

अहिराणी पोटभाषा संदर्भात **'अहिराणी बोली और उसके लोकसाहित्य का अध्ययन'** या पीएच्. डी. प्रबंधात **डॉ. विजयचंद्र जाधव** यांनी विविध मतप्रणालींचा परामर्श, ऊहापोह केलेला आहे. भिल्लोडी, राजस्थानी, निमाडी, शिंदी यांचेशी तुलना करून १२ व्या शतकात इतर सर्व भारतीय भाषांसमवेत 'अहिराणी' या स्वतंत्र भाषेचा जन्म झाला असे त्यांना वाटते. मराठी, गुजराथी, हिंदी बरोबरीने तिचा जन्म झाला असल्याने तिचे स्वतंत्र अस्तित्व आहे. त्यांच्या मते मराठी, गुजराथी, हिंदीची अहिराणी ही पोटभाषा नसून ऐतिहासिक परंपरा व सांस्कृतिक वारसा, भाषाविज्ञान कसोटीवर घासल्याने अहिराणी भाषा हिंदीशी निगडित आहे असा निष्कर्ष त्यांनी मांडला आहे.

अहिराणीचा उगम इ.स. २०० च्या आसपास झाला असावा व ती खानदेशातच उदयाला आली असे वाटते. **चंद्रवंशीय यादव, गोप** यांचा इ.स. ५००० वर्षांपूर्वीची जुनी भाषा (ईलावर्षी) व आजची नवीन भाषा प्रमाण स्वरूपात, सुसंस्कृत स्वरूपात यायला ग्रंथसंपदा व राजसंपदा ही अनमोल कारणे ठरतात. परंतु दुर्दैवाने अहिराणीच्या वाटेला जास्त समाजसत्ता उगमापासून असल्याने आजही ती बोलीच्या रूपाने टिकून आहे. आजही मंत्रालयात तिचा दरारा व वैभव नाही अथवा ह्या बोलीत प्रतिभासंपन्न लेखक व कवी उदयाला आले नाहीत.

अर्थात अहिराणीत लिखित साहित्य अजिबात नाही, अशी अनेकांची समजूत आहे, जी साफ चुकीची आहे. वानगीदाखल श्री ज्ञानेश्वरांचे एक गीत उपलब्ध आहे.

***'ये सो देना बाय तान्हा, माले म्हने हाई ले वो'***
***मी त बाई साधी भाई, गऊ त्यान्हा जवई***
***येईसन बिलगना, फाडी मन्ही चोयी।।'***

यात ७५ टक्के शब्द अहिराणीतील आहेत.

श्री. जयराम पंड्याकृत 'राधामाधव विलास चंपू' या काव्यात मोरीर भाटाची म्हणून जी बागलाणी गीते आढळतात, त्यात अहिराणी शब्द आहेत. काही बागलाणी पदात शहाजीराजांचा गौरव आढळतो. त्या पदातील अहिराणी शब्द बघा–

***'जठे जठे धाडतेस तठे तठे जायतेस कोन्हा नही करजेत हेवा!'***

तसेच शके १९२८ मधला एक शिलालेख पाटणा-तहसील चाळीसगाव येथे सापडला असून हा ज्ञानेश्वर ८४ वर्षे असून साधारणत: ३०० वर्षे पूर्व अहिराणी-साहित्य लेखनक्षम झाली होती हे सिद्ध होते. तसेच चाळीसगाव तालुक्यातील वाडेगुढे येथे शके १४८७ मध्ये अहिरराव कुळाचा मराठा जातीचा **महालिंगदास** नावाचा कवी होऊन गेला. त्याने संस्कृत ग्रंथांचे अहिराणीत भाषांतर केलेले आढळते. (मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २, पृष्ठ ५८७). दुसरा एक कवी जैतपीर ता. अंमळनेर येथे होऊन गेला. त्याने बागलाणी, अभीर व खानदेशी भाषेत कविता केल्या होत्या (शके १६२६). शके १६४८ मध्ये विदर्भातील जैन कवी निंबा याने एक पोथी लिहिली असून या पोथीत 'अहिराणी गीत' नावानेच एक भक्तिपर, उपदेशपर गीत आहे. तसेच धरणगाव येथे सदानंद स्वामी, खासणे ता. चोपडा येथील 'दगडू' नावाचे कवी होऊन गेलेत. त्यांनी ही रचना करून अहिराणी साहित्य-सृजनशीलतेला हातभार लावल आहे.

तसे पाहिले तर अहिराणी, अहिर, अभीर यांचे अस्तित्व आज सुद्धा भारतभर आहे. आपल्याकडे आपण 'कुणबी' म्हणतो तर उत्तर प्रदेशात 'कुरमी' हे तेच होय. गुजरात मध्ये 'पटेल' तर आंध्रात 'रेड्डी' हे एकच होय. गवळी राजाचे अवशेष अजूनही आपणास खेड्यात पाहावयास मिळतात. इतकेच नाही तर अहिराणीचे लोण हे नेपाळपर्यंत आहे. गंमत अशी की अहिराणीची जी लिपी आहे– देवनागरी, तीच लिपी नेपाळी भाषेची पण आहे. **बद्रिका प्रसाद कोयराला व मातृका प्रसाद कोयराला** हे नॅशनल प्रजा परिषदेचे नेते होत. तिथल्या राजाच्या विरुद्ध यांनी उठाव केला. तिथे पण नेपाळ काँग्रेस पक्ष आहे. त्याचे अध्यक्ष पुढे कोयराला झाले. एकदा काय झाले, मुंबईत प्रजासमाजवादी पक्षाचे रौप्यमहोत्सवी वर्ष होते. त्याला प्रमुख पाहुणे म्हणून हे कोयराला बंधू आले होते (१९५९). त्यांचे भाषण नेपाळी भाषेत चालले होते. त्याचा हिंदी अनुवाद दुभाषा करून सांगत होते. मात्र कोयरालांचे पूर्ण भाषण अंमळनेरचे त्यावेळचे आमदार श्री. गुलाबराव पाटील यांना पूर्ण समजत होते. कारण त्यांच्या नेपाळी भाषेतील बरीचशी शब्दसंपदा ही अहिराणी भाषेतही आहे. तेव्हा अशाप्रकारे अहिराणी भाषेचे हे अस्तित्व हे केवळ खानदेश, महाराष्ट्र किंवा भारत नसून आंतरराष्ट्रीय स्तरापर्यंत अहिराणी सेवेची मोजदाद आहे, असो.

आपल्या देशातल्या प्रदेशात पाहिले तर आंतरराज्य स्तरावर सुद्धा अहिराणी बोलीचे इतर बोलीभाषेशी बरेचसे साम्य आहे. विशेषत: कोकणी, असमी, मणिपुरीच्या संदर्भात ह्या समानतेमुळे आपणास अहिराणीचे राष्ट्रीय एकात्मतेच्या संदर्भात सुद्धा मोठे योगदान दिसून येते. उदाहरणार्थ कोकणी भाषेतील : भाऊ, बाप्पा, आक्का, खुर्ची, उशा, चप्पल, आंगन, बैलू, नांगर, वल्ली (ओली) हेचं अहिराणीत सुद्धा शब्द आहेत. अहिराणीची जी लिपी आहे तीच लिपी नेपाळी भाषेची पण आहे. तसेच अहिराणीत अनेक विदेशी भाषेचे शब्द आहेत. तसेच अनेक शब्द आंतरराष्ट्रीय भाषेच्या शब्दांशी मिळतेजुळते आहेत. म्हणून अहिराणी ही आंतरराष्ट्रीय बोली होय.

**असमी भाषेतील शब्द :** चष्मा, नाक, कान, दात, हात, घर, खिरीकी, दुवार (दरवाजा), कांच, लुंगी, नमस्कार, रामराम इत्यादी आपल्या अहिराणीत सुद्धा तशाच अभिप्रायाने आहेत.

**मणिपुरी भाषेतील शब्द :** च्या (चहा), माँ, बाबा, मामा, दादा, रूपा, रूपी, बजार इत्यादी.

**अहिराणीतील तत्सम शब्द :** जे शब्द संस्कृत भाषेतून जसेच्या तसे इतर भाषेत उतरतात त्यांना तत्सम शब्द म्हणतात. अहिराणीतील तत्सम शब्द- दया, देवा, गीता, साधु, हार, नाद, दान, धरम, मांडो, वनवास, पिंड, रूप, लोभ, चंदन, कारतीक, नंदी, रथ.

**अहिराणीतील अर्थ तत्सम शब्द :** संस्कृत उच्चारण्याचा प्रयत्नातून मूळ शब्दांचे स्वरूप बदलून अर्धतत्सम शब्दांत भर पडत गेली. संस्कृत शब्दाचा उच्चार खेड्यातील अनपढ लोकांना करता येत नसल्यामुळे शब्दास विकृती निर्माण होऊन ही संख्या वाढत गेली.

उदा. सतरूधन, माशिक, न्याव, सरगे, किरती, परसाद, रूशी.

अहिराणीतील देश्य शब्द : फद्या, झोपड, पोई, वडांग, झब्ब, मारग, झालर, डीर, झयं, बोंड, लोढ, मेंर, उजाडी इ.

**विदेशी शब्द :** खानदेश पहिल्यापासून समृद्ध असल्यामुळे परकीयांनी अनेक वेळा आक्रमण केले. तर कधी कधी दुष्काळामुळे (स.स. १६२६-२९) येथील लोकांनी शेजारील प्रांतात स्थलांतर केले. त्यामुळे परभाषांचा ह्या भाषेवर परिणाम होणे स्वाभाविक होय. अहिराणी प्रांत हा फारूकी राजापासून तर मोगलांच्या अस्तापर्यंत मुसलमानी सत्तेखाली होता. त्यामुळे अनेक फ़ारसी शब्द तिच्यात आढळून येतात.

**अहिराणीतील फारसी शब्द :** अजागा, आखरी, आब, कोरी, खुशाल, गुजरी, गुजस्ता, चावुक, जरीनी, देर, बदडणं, शिशी, साल, हलवाई, हावसी, सबागती, जिराईत, अफलातू, अलवार, मामलेदार, आवाज, तोफांडी, आबरू, उमेद, फिरयाद, आमदानी, तगतराव, खुसी, याद, सहेरं, असामी, जमीन, दुरबीन, जागीरदार, रोजंदारी, बराबर, दुसमन, बरफी, सरस, बादशा, वस्ताद.

**अहिराणीतील अरबी शब्द :** अक्कल, इतवार, अफवा, राजी, मुकाम, तमाम, मिथकत, तारीक, अत्तर, हिसाब, कसर, हुकूम, फुरसद, आलसुंक-मायसुक, गल्लत, सवाल, नुकसान, वायदा, खरस, मगरूर, राजी, हयवान, सायब, ताबेदार, बिलकुल, अत्राप, आफत, खातीरमा, तलफ, तकदीर, दवापानी, सराप, हालत इ.

**अहिराणीतील कानडी शब्द :** अन्ना, पापड, बघारस, आवडी, आडकित्ता, आजमदान, इट्ठल, उर, कुदायी, चरबी, जोते, ढबू, तोडल्या, ताट, तोंगल, ताटी, दिंडी, नथ, पोन्या, बिगी-बिगी, बेगडी, मायं, येड, बोंग्या, रट्टा, वंजारा इ.

**डॉ. बापूराव देसाई**
उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.

❑











## सांभार पोच

**हरवलेल्या वाटा :** केशव. बा. वसेकर : प्रतिभा प्रकाशन, परभणी, पृष्ठे १६०
**आगळी लोकगीते आणि परंपरा :** सुनंदा मोडखरकर : सुयोग प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७२
**गुलाबदाणी :** सुवर्णा दिवेकर, श्रीपाद प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८८
**योगायोग :** उषा दर्डा, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १३०
**सर्वोदय तीर्थ :** शांतिलाल भंडारी, चिरायु प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७६
**अक्षरसंस्कार :** रामदास बवले, जीवन प्रबोधिनी प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६५
**च. छ. ज. शिवाय झ. ट. ठडढण :** शरयु शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे १२०
**मधुगंध :** शरयु शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ३६
**क, का, की :** शरयु शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ६४
**व, वा, वी :** शरयु शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ३२
**सायली :** शरयु शहा, जयहिंद प्रकाशन, मुंबई, डोंबिवली, पृष्ठे ९२
**शांती अवेदना :** शरयु शहा, जयहिंद प्रकाशन, मुंबई, डोंबिवली, पृष्ठे ९२
**दुधावरची साय :** शरयु शहा, जयहिंद प्रकाशन, मुंबई, डोंबिवली, पृष्ठे ९२
**मुक्त राष्ट्रचिंतन :** वि. रा. सुदामे, राम-जानकी प्रकाशन, अमरावती, पृष्ठे १५६



अनुक्रमणिका

# 'मूलपाठदीपिका श्री ज्ञानदेवी'



**विश्वास वसेकर**

मराठी साहित्य-संस्कृतीचा मानबिंदू असणारा 'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ इ.स. १२८० मध्ये लिहिला गेला. नेवासा या गावी ज्ञानेश्वरांनी तिचे कथन केले आणि सच्चिदानंदबाबांनी ती लिहून घेतली. ही मूळ संहिता! त्या काळात मुद्रणकला अस्तित्वात नसल्यामुळे मूळ संहितेवरून तिच्या एक-दोन नकला ज्ञानेश्वरांच्या हयातीतच झाल्या असाव्यात. या नकलांच्या पुन्हा नकला आणि अशी परंपरा पुढील काळात चालू राहिली. नंतरच्या तीनशे वर्षांत अनेक प्रतींच्या या वंशावळी वाढत गेल्या. नकल करणारा त्याच्या हाती लागलेल्या प्रतीत काही तरी बदल करतोच आणि त्याच्या प्रतीवरून पुढे ज्या नकला होतात त्यात हे बदल संक्रमित होतात आणि पुन्हा नव्यांची भर पडते. एकनाथांच्या काळात असंख्य पाठभेदांचा असा सुळसुळाट झाला होता. तेव्हा त्यांनी त्यांच्या काळातली ज्ञानेश्वरीची अनेक हस्तलिखिते गोळा करून त्यातील पाठभेदांची चिकित्सा करून ज्ञानेश्वरीची प्रतिशुद्ध संहिता तयार केली हा इतिहास सर्वांनाच ज्ञात आहे.

आधुनिक काळात मराठी समीक्षेची पाठचिकित्सा ही ज्ञानशाखा विकसित झाली. प्रा. अ. का. प्रियोळकर हा तिचा प्रारंभबिंदू मानला जातो. ज्ञानेश्वरांची मूलपाठ आवृत्ती सिद्ध करणे हे या शास्त्रापुढचे सर्वांत मोठे आव्हान होते आणि आहेही. गेल्या शतकात माडगावकरांपासून श्री. ना. बनहट्टींपर्यंत ज्ञानेश्वरीच्या पाठचिकित्सेचे झालेले प्रयत्न आपल्यासमोर आहेत. या पार्श्वभूमीवर नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या प्राचार्य रामदास डांगे यांच्या 'मूलपाठदीपिका श्री ज्ञानदेवी' या ग्रंथाच्या पहिल्या खंडाचे आपण स्वागत केले पाहिजे.

मूलपाठ ज्ञानेश्वरीच्या संदर्भातील एकनाथांचे कार्य सर्वश्रुत आहे. त्याचप्रमाणे गोपाळाश्रमस्वामी यांचा एककलमी प्रयत्न तितकाच मोलाचा आहे. मुद्रणपूर्वकाळातील या दोन्ही महान संशोधकांच्या प्रयत्नांचा पुरेसा अभ्यास, ना सांप्रदायिकांनी केला, ना संशोधकांनी. जो काही थोडा फार केला तो पूर्वग्रहदूषित भूमिकेतून. उदाहरण द्यावयाचे झाल्यास, गोपाळाश्रमस्वामी-यांनी 'मिळेल ती ओवी आपल्या संपादनात स्वीकारली असावी' असे प्रा. पां. ना. कुळकर्णी आपल्या ज्ञानेश्वरीच्या संपादनात (पृ.२५) म्हणतात. गोपाळाश्रम प्रत ही प्रतिशुद्ध ज्ञानेश्वरी आहे हे साधे भानही न राखता काही अभ्यासकांनी तिला चक्क, पाटांगण परंपरेत बसविले!










डॉ. हर्षे तर 'गोपाळाश्रमस्वामींचा कल ज्ञानेश्वरी ओवी अधिक सुटसुटीत करण्याकडे होता' असे मानतात. यावरून या क्षेत्रातील एकंदर परिस्थितीचा अंदाज यावा.

हे सर्व नमूद करण्याचे कारण प्राचार्य डांगे यांच्या संपादनात असा कोणताही पूर्वग्रह नाही. ज्ञानेश्वरीच्या कोणत्याही एका प्रतीचा, परंपेरचा अभिनिवेश ते मांडत नाहीत. ते स्वत: एक निष्ठावान सांप्रदायिक आहेत, वारकरी आहेत. असे असले तरी त्यांची सांप्रदायिकता त्यांच्या संशोधनाच्या आड येत नाही हे विशेष! मात्र या कारणाने त्यांना दोन्ही बाजूंविरुद्ध लढा देण्याचेही प्रसंग वारंवार येतात हे या ग्रंथभर जाणवते. त्यातल्या त्यात क्वचित प्रसंगी ते 'सांप्रदायिकते'कडे झुकताना दिसतात. पहिल्याच ओवीतील 'जी' पाठाच्या संदर्भात मी हे म्हणू शकेन., 'जी' काय किंवा 'श्री' काय हे पाठ सांप्रदायिक आहेत. राजवाडे, पां. ना. किंवा श्री.ना.बनहट्टी यांच्या प्रतीत 'जी' किंवा 'श्री' नाही. 'जी' हा परंपरेने चालत आलेला तर 'श्री' नाथ प्रतीतील! हे दोन्ही पाठ मुळात नसावेत आणि असल्यास 'श्री' च्या शक्यता अधिक असे जाणकारांचे मत आहे. परंपरेने चालत आलेल्या पाठाचे प्राचार्य डांगे यांनी केलेले समर्थन हे व्यासंगदर्शक असले तरी पाठचिकित्साशास्त्राच्या आधारे ते कसे स्वीकारता येईल एवढाच माझा आक्षेप आहे. अर्थात अशी उदाहरणे तुरळक आहेत हेही नमूद केले पाहिजे.

या ग्रंथाचा अभ्यास करताना हे जाणवत राहते की पाठचिकित्सेसाठी आवश्यक असणारी साधने संपादक महाशयांनी कसोशीने जमविली आहेत. ज्ञानेश्वरीच्या जवळजवळ सर्वच मुद्रणप्रतींचा त्यांनी यथायोग्य पद्धतीने वापर केला आहे. दीडशे वर्षांतील शेकडो मुद्रित प्रती जमविण्याचा हा एक विक्रमच म्हणावा लागेल. त्यांनी मिळविलेली मौलिक हस्तलिखिते ज्ञानेश्वरीच्या पाठचिकित्सेला नवे वळण देणारी आहेत, हे त्यांनी केलेल्या त्यांच्या उपयोगावरून लक्षात येईल. मात्र या सामग्रीची त्यांनी केलेली समीक्षा फार त्रोटक आणि जुजबी वाटते. सविस्तर वर्णनाभावी त्या त्या प्रतीची लक्षण मीमांसा पुरेशी लक्षात येत नाही. कदाचित एकहाती काम असल्यामुळे असे घडले असेल; पण म्हणून त्याचे समर्थन होत नाही. किंबहुना अशा सविस्तर परिचयाची आवश्यकताच नाही, तो अपव्यय आहे असा त्यांचा एकंदर रोख दिसतो. तोही पटणारा नाही. प्रा. पां. नां. च्या ठायी असणारी संशोधकवृत्ती त्यांना आदर्शवत् वाटते. या पार्श्वभूमीवर मूळ संहितेत सरांनी (प्रा. पां. ना.) केलेली गाळागाळ, घातलेली भर, आणि अनावश्यक दुरुस्त्या यांमुळे संशोधक समजतात तसे 'मूळच्या लेखनात कोठेही फरक न करता,' ही त्यांची आधार न देता केलेली टीका-टिप्पणी प्रा. पां. ना. कुलकर्णी यांच्या संशोधनाविषयी अकारण गैरसमज निर्माण करणारी ठरणार नाही काय? राजवाडे प्रतीच्या संदर्भात प्रा. पां. ना. नी जी चूक केली तीच चूक प्रा. डांगे यांच्याकडून या प्रतीच्या संदर्भात झालेली दिसते.

पाठचिकित्साशास्त्राच्या संदर्भात प्राचार्य डांगे यांनी मांडलेली नवी प्रमेयेही अभ्यासकांनी पुन्हा एकदा तपासून पाहाणे आवश्यक वाटते. शास्त्राभ्यासाची एक शिस्त असते. अशी शिस्त आपल्या जवळ अभावाने आहे असे प्रा. डांगे मोकळ्या मनाने मान्य करीत असले

तरी ते पर्याप्त ठरत नाही. त्यांनी पाठचिकित्साशास्त्राच्या नियमांच्या संदर्भात घेतलेली भूमिकाच अनेक प्रश्नचिन्हं निर्माण करणारी आहे. त्यासंबंधी थोडेसे विवेचन–

Cardless collation हा प्रकार खरोखर अभूतपूर्व आहे. सुमारे नऊ हजार ओवीसंख्या असलेल्या ज्ञानेश्वरीच्या २०-२५ प्रती (त्यातही हस्तलिखिते अधिक) घेऊन प्रत्यक्षात पाठसंचनोंदणी करता येते का? हा त्यांचा प्रश्न आहे. 'न व्हायला काय झाले?' असे उत्तर त्यांचा प्रश्नाचा रोख समजून न घेता देता येईलही. पण असे काम कसे अशक्यप्राय आहे, हे श्री.रा.शं.नगरकर यांनाच विचारले पाहिजे. म्हणूनच कदाचित प्राचार्य डांगे यांनी डॉ. सुखटणकरांचे 'Who has any practical experience' हे विधान पहिल्याच पानावर उद्धृत केले असावे. परंतु त्यांनी स्वीकारलेली रीत कितीशी निर्दोष आहे हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे.

ज्ञानेश्वरीच्या पाठपरंपरा हा अभ्यासकांना उपयुक्त वाटणारा घटक प्राचार्य डांगे यांनी पूर्णतया मोडीत काढला आहे. या संदर्भातील त्यांची मांडणी तर्कशुद्ध असली तरी पाठपरंपरा हा प्रकार वांझेच्या मुलाच्या जन्मपत्रिकेएवढा अर्थशून्य निश्चित नाही. प्रियोळकर, दावतर, कृ. पां. कुलकर्णी, कोलते, डोळके, हर्षे, पां. ना. कुलकर्णी, बनहट्टी, म. वा. धोड, श्री. रं. कुलकर्णी, म. रा. जोशी, कृष्णा गुरव या अशा अनेक अधिकारी अभ्यासकांनी पाठपरंपरांविषयी मांडलेले विचार निरर्थक कसे म्हणता येतील? महानुभावांच्या चरित्रग्रंथाच्या परंपरेलाही, ज्या गुरुमुखातील पाठांच्या आधारे तो-तो पाठ निर्माण झाला त्या-त्या गुरुपरंपरेचे नाव मिळाले आहे. उदा. हिरांबा पाठ, नागनाथ पाठ. या धर्तीवर सच्चिदानंद, सिद्धनाथ, एकनाथ, पाटांगण, बरवे (आणि स्वतंत्र) अशा परंपरा मानण्यात, पाठनिश्चितीसाठी त्याचा उपयोग नाही हे मान्य करूनही काय अडचण आहे हे अधिक स्पष्ट झाले पाहिजे. ज्ञानेश्वरीच्या मौखिक परंपरा नव्हत्या का? हेही एक न सुटणारे कोडे आहे. संपादकांनी या संदर्भात उपस्थित केलेले प्रश्न मुळीच विचारात घेण्यासारखे नाहीत काय, हाही प्रश्न आहेच.

Lower आणि Higher Criticism संबंधी प्राचार्य डांगे यांनी उपस्थित केलेले प्रश्न खरोखर महत्त्वाचे आहेत. Textual Criticism हा मुख्यत: Lower पद्धतीचाच असतो म्हणून डॉ. अशोक केळकरांसारखे अभ्यासक पाठचिकित्सेला इंग्रजी पर्याय वापरतात Textual Criticism or Lower Criticism असाच शब्दप्रयोग करतात. ('भाषा व साहित्य संशोधन' पृ. ३१६) Higher Criticism चा या दृष्टीने पाठनिश्चितीच्या संदर्भात किती व कसा उपयोग आहे हे सोदाहरण पुढे येणे गरजेचे आहे. प्रा. डांगे यांनी मांडलेला हा विचार मूलभूत स्वरूपाचा म्हणून अभ्यासकांनी विचारात घ्यायला हवा. पुरालिपिशास्त्राचा (याला उषा मा. देशमुखांनी 'अक्षरविन्यासशास्त्र' असा शब्द प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेत योजिला आहे.) अशा अभ्यासामध्ये कशा तऱ्हेचा उपयोग आहे हे शास्त्रीय पद्धतीने आवश्यक होते. मराठी पाठचिकित्सेच्या संदर्भात या सर्व घटकांची पुनर्मांडणी ही किती आवश्यक आहे हे प्रा. डांगे यांच्या अभिप्रायामुळे लक्षात येते.



अनुक्रमणिका

व्याकरण आणि अर्थ या बाबतीत अभ्यासकांचे फार गैरसमज आहेत. 'व्याकरणाला महत्त्व देणे आवश्यक नाही' असे डॉ. म. रा. जोशी मानतात तर प्रा. म. वा. धोंड 'अर्था' ला दुय्यम दर्जा देतात. प्रा. डांगे यांनी या संदर्भात मांडलेले विचार पाठसंशोधनाला नवी दिशा देणारे आहेत. या दृष्टीने त्यांनी उद्धृत केलेली 'मनोमहिषाचेनि मुंडे' या पदांच्या तृतीयेकडे केळकरांसह सर्वच अभ्यासकांनी केलेले दुर्लक्ष प्राचार्य डांगे यांनी नेमकेपणाने लक्षात आणून दिलेले आहे. 'कुचभाराचे उठणें कीं पडणें' हे अमृतानुभवातील विलक्षण उदाहरण अर्थदृष्ट्या चिंतेची बाब आहे हे अमान्य करून कसे चालेल? अशा प्रसंगी प्राचार्य डांगे 'परतस्तु सः' (गीता ३.४२) किंवा ईशावास्यातील आचार्यांनी बदललेला पाठ अशी नेमकी उदाहरणे देऊन सर्वांनाच विचारांत पाडतात!

प्रस्तुत ग्रंथाला प्राचार्य डांगे यांनी लिहिलेल्या 'प्रस्तावो' वरून एक गोष्ट मात्र सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट होते. संशोधनक्षेत्रात स्थिरपद झालेले डॉ. हर्षे, डॉ. म. रा. जोशी, डॉ. वाबगावकर, प्रा. पां. ना., डॉ. द. भि. कुलकर्णी, पं. बाळाचार्य खुपरेकर, प्रा. कृष्णा गुरव, प्रा. म. वा. धोंड आदि विद्वानांनी मांडलेल्या प्रमेयांची त्यांनी केलेली चिरफाड ही 'शास्त्रक्रिये'त बसण्याइतपत काळजी प्रा. डांगे यांनी घेतलेली आहे. त्यांच्या 'प्रस्तावो' त आलेले संदर्भ देखील नव्याच नव्हे तर जुन्या अभ्यासकांनाही स्तिमित करून सोडणारे आहेत. एवढ्यासाठी जरी प्राचार्य डांगे संपादित हा ग्रंथ वाचला तरी अभ्यासकाचे अभ्यासाचे क्षेत्र विस्तारल्याशिवाय राहणार नाही असा विश्वास वाटतो.

प्राचार्य डांगे यांनी स्वीकारलेला पाठशुद्धीचा क्रमही विलक्षण आहे. अशी अनेक हस्तलिखिते आहेत की अजूनही ज्ञानेश्वरीच्या ओवीसंख्येत भर पडून ती 'दशसाहस्री' ठरण्याची शक्यता नाकारता येत नाही. अशा निवडक २०-२५ प्रती हाताळून (त्या सर्वच प्रतींचा निर्देश होणे शास्त्रदृष्ट्या आवश्यक आहे.) प्रक्षेप, अवक्षेप आणि प्रतिक्षेप व विक्षेप यांचा एकसमयावच्छेदे करून विचार करणे सोपे नाही. किंबहुना हा स्वतंत्र संशोधनाचा विषय ग्रंथरूपाने मांडता येईल एवढा त्याचा व्याप होऊ शकतो. प्रति-क्षेप = पर्यायी आणि वि-क्षेप = नवोपलब्ध ह्या आकर्षक संज्ञाही त्यांनीच प्रथमतः मांडल्या आहेत. कालौघात त्या दुरुस्त होतीलही. परंतु अशा तऱ्हेची वर्गवारी शास्त्रपूत नाही असे कसे म्हणता येईल?

सहाव्या अध्यायाच्या शेवटी आलेली अत्यंत आवश्यक अशी नाममुद्रेची ओवी एकाही मुद्रित प्रतीत नाही. ती प्रा. पां. ना. संपादित 'ज्ञानेश्वरी'तही नाही हे वेगळे सांगणे नलगे. ती ओवी या प्रबंधाच्या माध्यमातून अन्वर्थकपणे प्रथमच प्रकाशात येत आहे. या ओवीच्या संदर्भात साताऱ्याच्या श्री. रा. कृ. धोंगडे यांनी ती प्रथम प्रकाशात आणली हेही सांगावयाचे प्राचार्य डांगे टाळत नाहीत. (श्री. धोंगडे यांनी अशी प्रकाशात आणली हेच आमच्या अभ्यासकांना माहीत नव्हते! आणि ज्यांना ते माहीत होते त्यांनी त्याकडे सोईस्करपणे दुर्लक्ष केले.)

ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या आणि ओवीअंकाच्या बाबतीत प्राचार्य डांगे यांनी केलेले संशोधन मार्मिक स्वरूपाचे आहे. त्यांनी मांडलेला नवांक सिद्धांत हा नवा नसला तरी नव्या

रूपात, ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्त्व, शैली लक्षात घेऊन आलेला आहे. तरी देखील सांप्रदायिक आणि संशोधक त्यास कितपत उजवा कौल देतील, अशी मनात उगीचच शंका येते.

ओवीचरणातील अक्षरसंख्येबाबत त्यांनी केलेली निरीक्षणे ही पूर्णतया मौलिक स्वरूपाची आहेत. एवढेच नव्हे तर प्राचीन, प्राचीनतम समजल्या जाणाऱ्या नकलप्रती कशा भ्रष्ट आहेत हे कळून येते. ज्ञानेश्वरीच्या संदर्भात एक गोष्ट आवर्जून स्पष्ट करावीशी वाटते (आणि ती कोणाच्याही लक्षात आलेली नाही किंवा घेतलेली नाही) की नकलप्रतीवरील शकांक हा मुळीच उपयोगाचा नाही. कारण हा निर्देश नकल करण्याच्या काळाचा असतो. प्राचार्यांनी हा मुद्दा समर्थपणे त्यांच्या शैलीतून मांडला आहे.

**विश्वास वसेकर**

अंबिका, क्रांती चौक, परभणी ४३१४०१

❑

---

## साभार पोच

**डॉ. राजेंद्रसिंह (जोहाडचे जलनायक) :** सौ. लीला शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ५८

**भारतरत्न मानकरी :** विठ्ठलराय भट, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, पृष्ठे १३६

**माझा (नकोसा झालेला) देश :** मनीषा गुंजाळ, ऑथेंन्टिकोज मीडिया एसमास, नासिक

**शाहू :** श्रीराम ग. पाचिंद्रे, प्रकाशक नरेशचंद्र कोठाळे, अमरावती, पृष्ठे २२६

**मी काय करू? :** आश्लेषा महाजन, नूतन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६८

**तलाठी :** जगन्नाथ दुर्गुळे, प्रमोद प्रकाशन, नेर्ले, पृष्ठे १४०

**सरगम :** अरुण पुराणिक, शोभा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ११२

**संगीत यात्रा :** रोचना भडकमकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २५६

**शुभ सकाळ :** सुलभा हेर्लेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७४

**मातीतली माणसं :** रवीन्द्र पांढरे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४८

**समकालीन भारतीय राजकारण :** सुहास पळशीकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३१६

**श्री समर्थांच्या सामाजिक जाणिवा :** कुमुदिनी देशपांडे, सत्कार्योत्तेजक सभा, धुळे, पृष्ठे १८०

**उत्सव :** सुप्रिया वकील, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे ८०

**अक्षरमंच :** संपादक योगेश जोशी, माऊली प्रकाशन, कल्याण, पृष्ठे ९६

**मनाचिये गुंती :** सरोज सोनावणे, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे ६८

**तत्कालीन :** निरंजन उजगरे, स्वरंग निर्मिती, ठाणे, पृष्ठे १०२

**कलम कसाई :** संजय कप्तान, देशमुख आणि कंपनी (पब्लिशर्स) प्रा. लि. पुणे, पृष्ठे १३८

# समकालीन ग्रामीण जीवन आणि साहित्यिकांची जबाबदारी



प्रा. डॉ. चं. वि. जोशी

मराठी साहित्याच्या मूळ प्रवाहाला अधिक समृद्ध करण्यात ग्रामीण साहित्याने महत्त्वाची भूमिका बजावली आहे. खेड्यातील माणसे, त्यांची देहयष्टी, त्यांचे स्वभावधर्म, वृत्ति-प्रवृत्ती, रीतीरिवाज, जीवनशैली, पेहराव, खाणे-पिणे, सणोत्सव, भाषिक लकबी यांचे प्रभावी दर्शन ग्रामीण साहित्यातून घडते. व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील, द. मा. मिरासदार, सखा कलाल, चारुता सागर, भास्कर चंदनशिव इ. लेखकांनी ग्रामीण जीवनाचे दर्शन घडवून आपल्या सकस जीवनदृष्टीचा प्रत्यय आणून दिला आहे. आजच्या परिस्थितीत ग्रामीण जीवनाचा चेहरा बदलला आहे. ग्रामीण जीवनावर सामाजिक, राजकीय, आर्थिक आणि धार्मिक परिवर्तनाचा खोलवर परिणाम झालेला आहे. समकालीन ग्रामीण साहित्याचा विचार करताना या घटकांना नाकारताच येणार नाही. अत्याधुनिक तंत्रज्ञानाने जग जवळ येत असले तरी माणसापासून माणूस तुटत चाललेला आहे. 'माणूसपण' हरवून बसलेली माणसे आपल्या चिंतनाचा विषय व्हायला हवीत. खेड्यातली माणसे माणसांच्या सुखदु:खांशी बांधलेली आहेत. ती जिवंत आहेत कारण त्यांच्या जगण्याला अर्थ आहे. जगण्यात ओलावा आहे. ग्रामीण लेखकांनी या माणसांची नीट पारख केलेली आहे. पराकोटीचे प्रेम आणि पराकोटीचे शत्रुत्व जपणारी माणसे खेड्यात जशी आहेत तशी सहिष्णुवृत्तीने 'माणूसपणाला' शरण जाणारी माणसेही खेड्यातच आहेत. भोळी तशी बेरकी, शब्द मोडणारी व जपणारी ही माणसे जगतात कशी? त्यांच्या जीवनधर्माचा शोध घेण्यासाठी ग्रामीण लेखकांनी आपले आत्मभान सतत जागेच ठेवायला हवे.

ग्रामीण जीवनाचा मूलाधार 'शेती' हाच आहे. मातीशी निष्ठा राखणारी, कष्टाची पूजा बांधणारी, जितरब्यांवर प्रेम करणारी माणसे या शेतीचा श्वास आहेत. ही गोष्ट आनंद यादवांचा 'गोतावळा' हा चित्रपट अधिक प्रभावीपणे स्पष्ट करतो. शेतीनिष्ठ जीवनव्यवस्थेशी ज्या-ज्या घटकांचा संबंध येतो त्या सर्वच घटकांचे चित्रण फार प्रभावीतपणे ग्रामीण साहित्यात आलेले नाही. सर्वच स्तरांवर झालेल्या परिवर्तनाचा साक्षेपी विचार दृष्टीस पडत नाही. जे प्रयत्न होतात, ते अंशत: असल्याने पुरेसे नाहीत.

ग्रामीण माणूस दरिद्री, फाटका म्हणूनच त्याच्याकडे पाहिले जाते. त्याची उपेक्षा



अनुक्रमणिका








झाल्याने तो खचून जाताना दिसतो. जातीयवाद, बेकारी, कर्ज, अडवणूक, बाजारभाव, कौटुंबिक ताणतणाव, अवर्षण अशा सर्वच नैसर्गिक कृत्रिम आपत्तींना तोंड देताना तो शक्तिहीन होतो. त्या त्या प्रदेशातील घटकांचे चित्र ग्रामीण साहित्यात उमटले असते तरी समकालीन ग्रामीण लेखकांनी वास्तवतेचे भान ठेवून लिहायला हवे. ज्या समाजाचे आपण लेखक या नात्याने प्रतिनिधित्व करतो त्या समाजाचे वास्तव हे आपलेही वास्तव आहे, याचा विसर पडायला नको.

शिक्षणाचा उद्देश सुसंस्कृत होणे हा राहिला नसून नोकरी-व्यवसाय करून अधिकाधिक पैसे कसे मिळतील, असा मर्यादित झाला आहे. खेड्यात दहावी शिकलेले तरुण शहराची वाट धरतात. बेकारीची समस्या उभी राहते. तरुणाचे जीवन उद्ध्वस्त करणारी नि थोरांची स्वप्ने भंग करणारी ही बेकारी चिंतनाचा विषय आहे. पूर्वीचे खेडे स्वयंपूर्ण, एकसंध होते. ते विकेंद्रित झाले आहे. अशावेळी तरुणांना स्वयंरोजगार कसा मिळेल, याचा विचार व्हायला हवा. ग्रामीण लेखकांनी विश्लेषक पद्धतीने या विचाराची रुजवण करायला हवी. सर्वच बाजूंनी उद्ध्वस्त झालेले खेडे पुरेशा ताकदीने साहित्यात व्यक्त करायला हवे. समकालीन ग्रामीण लेखकांनी ही जबाबदारी स्वीकारायला हवी.

बदलत्या जातीय राजकारणात अनेक तरुण भरडले जाताना दिसताहेत. राजकीय लोक तरुण रक्ताचा सोईस्कर वापर करून घेताहेत. फसलेल्या आयुष्याचा सूड घेण्यासाठी असे तरुण राजकारणात वहावत जाताहेत. अशावेळी त्यांचे लक्ष आधुनिक गोष्टींकडे वळवायला हवे. म्हणून आधुनिक शेतीतंत्र, शेतीला पूरक व्यवसाय, नवी अवजारे, औषधे, पाणीव्यवस्थापन, सुधारित खते, बी-बियाणे अशा गोष्टींचे प्रशिक्षण देऊन त्याच्यासह ग्रामीण जीवनाची व शेतीची व्यवस्थित घडी बसवायला हवी. ग्रामीण साहित्यातून असा आदर्श स्पष्ट व्हायला हवा.

सर्वच बाजूंनी खेडे उद्ध्वस्त होत असले तरीही खेड्यातूनच शुद्ध स्वरूपात लोकसंस्कृतीचे प्रतिबिंब पहायला मिळते. खेड्यातील जत्रा, व्रतवैकल्ये, नवससायास, जादूटोणा, अंधश्रद्धा, जीवनजाणिवा, स्वभावधर्म, नातीगोती, रागलोभादी भावना, कुटुंबव्यवस्था, व्यवसाय, जातिधर्म, जीवनशैलीचे रंगतदार नमुने, व्यक्ति-व्यक्तींचे परस्परसंबंध, सामंजस्य, शत्रुत्व, व्यवहार, स्त्री-पुरुषसंबंध, लोककला, आर्थिक व्यवहाराची केंद्रे हे सारेच घटक लोकसंस्कृतीचे आकलन होण्यासाठी महत्त्वाचे आहेत. ग्रामीण लेखकांनी या समूहघटकांचा आविष्कार करायला हवा. म्हणून ग्रामीण लेखकांची दृष्टी अधिक व्यापक, सर्वस्पर्शी असायला हवी.

आजच्या ग्रामीण लेखनातून हे सर्व चित्र, बारकाव्यांसह स्पष्ट होते आहे का? याचे समाधानकारक उत्तर सापडत नाही. उदाहरण द्यायचेच झाले तर मोठ्या प्रमाणात ग्रामीण कवी शहरी चेहऱ्याची कविता लिहिताना आढळतात. उदंड कविता लिहिणाऱ्यांना सुयोग्य शब्दकळेचे भान नाही. नजरेत भरेल अशी ग्रामीण कविता क्वचित वाचायला मिळते. ग्रामीण कवी सकसपणा व समर्थ प्रत्ययाचा गांभीर्याने विचार करत नाहीत. ज्या कवितेत अशी अंगभूत वैशिष्ट्ये आहेत, ती कविता वाचकांसमोर येत नाही. कवितेतही 'रिमिक्स'पणा

आला आहे. प्रसिद्ध गाण्याची लय उचलून चटपट कविता लिहिणारे गल्लाभरू कवी 'रिमझिम' करीत येताहेत. या सर्व प्रसिद्धींच्या विळख्यातून ग्रामीण कविता स्वतंत्र व्हायला हवी. चार कविता लिहून प्रत्येक व्यासपीठावर त्याच कवितांची एकसारखी पुनरावृत्ती करणारे क्षीण कवी व त्यांची पाठराखण करणारा कळपप्रमुख यांच्यामुळे ग्रामीण कविता अडगळीत पडली आहे.

कथेच्या क्षेत्रातही फारसे आशादायी चित्र दिसत नाही. ग्रामीण कथानुभव ताकदीने मांडणारे कथालेखक हाताच्या बोटांवरच मोजता येतील. परिवर्तनाच्या झंझावाताला शरण जाऊन बदलणारे खेडे किती विकृत झाले किंवा होत आहे याचा नेमका प्रत्यय आणून देणारी, त्यावर उपाय निघेल असे चित्र मांडणारी ग्रामीण कथा तुरळक दिसते. ग्रामीण कथाकार मानवी जीवनाला भिडणाऱ्या समस्यांपेक्षा हलका-फुलका,तकलादू अनुभव रंजकपणे रेखाटण्यात अडकला आहे. ग्रामजीवनातील विविध अनुभवांनी परिपुष्ट झालेला 'माणूस' समर्थपणे चित्रित केला जात नाही. देवदत्त हुसळे यांच्या काही कथांमधून ग्रामीण व्यक्तींच्या विभिन्न वृत्ति-प्रवृत्तींचे दर्शन तपशिलांसह आले आहे. कारण ती कथा अस्सल मातीतली कथा आहे. ग्रामीण आणि दलित कथांची ही दुरवस्था दूर व्हायला हवी. त्यासाठी नव्या दमाच्या ग्रामीण कथाकारांनी अधिक वास्तववादी होणे गरजेचे आहे.

कादंबरीसारखा बहुपेडी वाङ्मयप्रकार ग्रामीण लेखकांनी वाळीत टाकला की काय, असा प्रश्न पडतो. कादंबरी ही मानवी जीवनाचे, समस्यांचे दर्शन घडविते. तिने समग्रलक्ष्यी व्हायला हवे असे जरी वाटत असले तरी तिच्या मर्यादांची जाणीव ठेवूनही असे म्हणावेसे वाटते की ग्रामीण कादंबरीने एखाद्या ग्रामानुभवाचे अस्सल आशयाचे विविध संदर्भाने दिग्दर्शन करावे. या अंशदर्शनातही तिने वास्तवाला भिडायला हवे. मोहन पाटलांची 'बस्तान', सदानंद देशमुखांची 'बारोमास' अशा काही कादंबऱ्या या दृष्टीने महत्त्वाच्या ठरतात. खेड्याची मूलभूत वैशिष्ट्ये स्पष्ट करणारी ग्रामीण कादंबरी मोठ्या प्रमाणात येणे गरजेचे आहे.

ग्रामीण कादंबरीकारांनी एकूण परिवर्तनाचा खेड्यावर नेमका कोणता परिणाम झाला, याचे वैविध्यपूर्ण दर्शन घडवावे. पाश्चात्त्य संस्कृतीचे अंधानुकरण खेड्यापर्यंत पोहोचले आहे. ग्रामीण तरुण आपली ऊर्जा व्यसनांमध्ये खर्च करीत आहे. बिघडलेल्या ग्रामसंस्कृतीत, व्यक्तिगत आणि कौटुंबिक, सामाजिक दुर्दशा होत आहे. अनेक रूपांनी गुन्हेगारी वाढत आहे. अंधश्रद्धेला बळी पडून कोवळ्या बालकांची अपहरणे आजही कमी झालेली नाहीत. त्याचबरोबर महत्त्वाचे म्हणजे ग्रामीण स्त्रीचे सर्वस्तरांवर सर्वप्रकारचे शोषण होत आहे. तिच्या लेखी स्त्री-मुक्ती कुठेय? तिचे शोषण आणि त्यातून तिला हवी असणारी मुक्ती याबाबतचे विचार सैद्धान्तिक पातळीवर खेड्यातही रुजवायला पाहिजेत. ग्रामीण कादंबरीने कलात्मकतेपेक्षा वास्तववादी होणे गरजेचे आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, सक्रिय राजकारण, माहितीचा अधिकार, आर्थिक सवलती, वैचारिक जागृती, आत्मप्रतिष्ठा, मानसिक गुलामगिरीतून मुक्तता, नव्या तंत्रज्ञानाची गरज अशा अनेक घटकांचे दर्शन समकालीन ग्रामीण साहित्यिकांनी आपल्या

साहित्यातून घडविणे गरजेचे आहे. सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्याच्या जाणिवेतून नवा तरुण वर्ग कसा उभा राहील याचे भान आणून देण्याची जबाबदारी समकालीन ग्रामीण लेखकांनी उचलली पाहिजे.

ग्रामीण नाट्यलेखनांची अवस्था तर चिंताजनक आहे. ग्रामीण नाट्यलेखनाचा अभाव आहे. वगनाट्यासारखे लेखन तात्कालिक स्वरूपातूनच होते. त्यातही मनोरंजनाचा भाग अधिक असतो. ग्रामीण ललितलेखन तर अलीकडे आढळतही नाही. डॉ. आनंद यादवांचे ललितलेखन वानगीदाखल देता येईल. ललित लेखनाचे स्वरूपवैशिष्ट्ये याविषयीचे ज्ञान असणे ग्रामीण लेखकांना आवश्यक वाटत नसावे; किंवा अशा लवचिक स्फुट प्रकाराकडे तो एकतर दुर्लक्ष करीत असावा किंवा त्याची प्रतिभा सीमित असावी. ललित लेखनाबाबत ग्रामीण लेखकांना नवा 'फॉर्म' सापडला तर उत्तमच..!

ग्रामीण माणसाची सर्वस्तरीय उपेक्षा समकालीन लेखकांनी मांडायला हवी. त्याचे अज्ञान, अगतिकता, दुबळेपणा, त्याची स्वप्ने इ. गोष्टींचा वेध घ्यायला हवा. समृद्धीचा मंत्र देऊन त्याला उद्योगी होता यायला हवे. पाणीव्यवस्थापन, शेतीचा दर्जा, अर्थ समृद्धीविषयी त्याला जाग आणायला हवी. बदलत्या अर्थव्यवस्थेतही शेतकरी दरिद्रीच राहिला आहे. सलग पडणारे अवर्षण आणि कर्जाचे ओझे यांत तो चिरडून जात आहे. न पडणारा पाऊस नि जलसिंचन योजनांचे फसवे प्रयोग त्याच्या जीवनाचे प्रश्न भीषण करताहेत. पडीक जमीन, गुरांचा प्रश्न, जनावरांच्या छावण्या, कुपोषण या संकटांशी दोन हात करतानाच तो आत्महत्या करू लागला आहे. राजकीय परिस्थिती तर त्याची सर्वच स्तरांवर चेष्टा करीत आहे. अशा स्थितीत शेतकऱ्यास विद्रोहाला भाग पाडणाऱ्या साहित्याच्या निर्मितीची गरज आहे. ग्रामीण लेखकांनी ही बांधीलकी स्वीकारून साहित्य निर्माण करायला हवे. उसन्या अनुभवांवर विसंबून न राहता अस्सल अनुभवांची मांडणी करायला हवी. ग्रामीण लेखकांनी आत्मीयतेने, आपलेपणाने या समस्यांचा वेध घेतला पाहिजे.

परिवर्तनशील खेड्यातला बदलता माणूस समजून घ्यायला हवा. शेतीतले नवनवे प्रयोग, ठिबक सिंचन, फळांची व फुलांची शेती, पाणलोट क्षेत्र, एडस् जागृती, भ्रष्टाचारमुक्त खेडे, ग्रामस्वच्छता, पूर्ण साक्षरता, हागनदारीमुक्त खेडे, व्यसनमुक्ती अशा आदर्श खेड्यांची बांधणी साहित्यातून व्यक्त व्हावी. यासाठी आपण नैतिक व सामाजिक जबाबदारीची जाणीव बाळगायला हवी. म. गांधीजींच्या कल्पनेतले संस्कारशील आदर्श खेडे चिंतनाचा विषय व्हावा. बदलत्या ग्रामीण वास्तवाला सामोरे जाऊन अधिक तपशिलांसह ते मांडायला हवे. समीक्षकांनी अशा साहित्याचे स्वागत करायला हवे.

**प्रा. डॉ. चं. वि. जोशी**

पदव्युत्तर मराठी विभाग, अहमदनगर महाविद्यालय, अहमदनगर– ४१४००१

❑



अनुक्रमणिका







## आजीव सभासद यादी

१) गोखले कुलकर्णी, अंजली श्रीधर, सोलापूर
२) होसूरकर सीमा अनंत, सोलापूर
३) पाटील किसन म., जळगाव
४) मोरे अशोकराव गणपतराव, भोसरी
५) देसाई विनया विश्वेश, पुणे
६) धेंडे घन:श्याम विश्वनाथ, पुणे
७) काण्णव विलास रामचंद्र, वरोरा
८) चिपलकट्टी विवेक मुरलीधर, पुणे
९) पुसाळकर दीपा विवेक, पुणे
१०) कात्रे श्रीपाद नीळकंठ, कोरेगाव
११) घाडगे राजेंद्र मानसिंगराव, सातारा
१२) सुरू श्यामल अनंत, पुणे
१३) नगरकर संजय पांडुरंग, जुवाढी
१४) माळी बाळकृष्ण मुकुंद, भिवंडी
१५) चिलवलवार रंगन, भिवंडी
१६) धामणकर रेखा अनिरुद्ध, भिवंडी

---

## साभार पोच

**मरणदारी :** रा. रं. बोराडे, देशमुख आणि कंपनी (पब्लिशर्स) प्रा. लि., पुणे, पृष्ठे १०८
**'मी' आहे :** वृंदा दिवाण, अक्षता प्रकाशन, पुणे, पृष्ठे २२४
**काव्य प्रयास :** संपादित, प्रकाशक निशिकांत गोडबोले, पिंपरी, पृष्ठे ६४
**ह्या आडवाडा :** विठ्ठल सोनवणे, विवेक प्रकाशन, मोहन देवळे, पृष्ठे ९४
**योग आणि मन :** संप्रसाद विनोद, अनमोल प्रकाशन पुणे, पृष्ठे १६८
**अपूर्ण संघर्ष :** पवन मांडवकर, सेवा प्रकाशन ग्रंथ वितरण, अमरावती, पृष्ठे १६०
**संस्कार :** शीला श्याम, पवन मांडवकर, सेवा प्रकाशन ग्रंथ वितरण, अमरावती, पृष्ठे ६०
**साळी संतदर्शन :** संपादक नरेंद्र सीताराम मारवाडे, पैठणी प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ११२
**श्री गणेश अध्यात्मदर्शन :** परशुराम माधव पांडे, मनोरमा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ५२८
**जीवन त्यांना कळलं हो!- भाग १ :** मंदा आचार्य, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२८
**माणगाव ते गरुडेश्वर :** संकलन शं. बा. मठ, अरविंद प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६८
**मध्यप्रदेशीय (मराठी साहित्य परामर्श) १९३७ ते २००१ :** अनिल गजभिय, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे २६४
**आधारवड :** के. बी. दास, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११२
**नाना फडणीस आणि मराठी राज्य प्रशासन :** मधुकर कुलकर्णी, प्रकाशक मधुरा म. कुलकर्णी, पुणे, पृष्ठे १०८
**जनसेवा हीच ईश्वर सेवा :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३६
**कष्टाचा रुपया :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२
**केल्याने होत आहे रे :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७२
**एकरूप होऊ सगळे :** ज्योतीराम कदम, चित्रभारती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३६



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







# सांताकडून अनंताकडे निघालेली 'पालखी'



**आशा भिडे**

(पालखी- (काव्यसंग्रह) प्रा. उषा लिमये, शारदा प्रकाशन, ठाणे, पृष्ठे-७९. मूल्य ८०/- रुपये) स्त्री, वसंत, वाङ्मयशोभा, सह्याद्री, दीपावली इ. मासिकांतून व प्रसिद्ध नियतकालिकांतून प्रसिद्धी.)

'विसावा' या १९५५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या (वि. स. खांडेकर यांची प्रस्तावना) काव्यसंग्रहानंतर (प्रदीर्घ विसाव्यानंतर) ) अलीकडेच वयाच्या ऐंशीव्या वर्षी प्रसिद्ध झालेला हा कवयित्रीचा दुसरा काव्यसंग्रह. उषा लिमये या विदर्भातल्या ज्येष्ठ कवयित्री. इंदिरा, संजीवनी, पद्मा, शांता शेळके यांच्या पिढीतल्या, समकालीन कवयित्री, संसार मुलेबाळे सांभाळून उशिराने शिक्षण घेऊनही एम.ए. (मराठी) प्रथम वर्गात. बेहेरेपदाच्या मानकरी. माजी संरक्षणमंत्री यशवंतराव चव्हाण यांच्या हस्ते पुरस्कार प्राप्त. १९६४ ते १९८३ पर्यंत नागपूरच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर महाविद्यालयात मराठी विभागप्रमुख.

'विसावा' संग्रहामुळे सर्वांस परिचित झालेल्या उषाताईंचे 'निवेदनं रामायण' स्वगत नाट्यशैलीतले ललित गद्य पुस्तक. यांच्या अनेक गाजलेल्या प्रयोगांमुळे त्या जास्त लोकप्रिय झाल्या. 'गीत गजानन' ही त्यांची आणखी भक्तिगीतरचना. त्याची द्वितीयावृत्ती नुकतीच प्रसिद्ध झालेली आहे. महाराष्ट्रात त्याचे हजारावर प्रयोग झाले आहेत व होत आहेत. AIR-६५ च्या त्या आकाशवाणीच्या कवयित्री आहेत. त्यामुळे त्यांची भावगीते, भक्तिगीते लोकांना सुपरिचित आहेत. आकाशवाणी, दूरदर्शनवरून कविसंमेलनाचे संचलन व गावोगांवी कविसंमेलनात सहभाग. 'दारी याचक उभा' ही HMV ची ध्वनिमुद्रिका. 'स्तवने न्हाली इतिहासाची पाने' या कवितेला शासनाचा पुरस्कार प्राप्त. 'इरिंग मिरिंग, लौंगा तिरींग' हा बालकुमार गीतसंग्रह, 'पाळण्यापासून पाळण्यापर्यंत' ही पुस्तकेही 'शारदा प्रकाशन' तर्फे प्रसिद्ध.

'पखाली'– व्यक्तिचित्रणे, 'अग्निदिव्य' ही अहिल्याबाई होळकर यांच्या जीवनावर कादंबरी, 'समीधा' वंदनीय मावशी केळकरांवर कादंबरी, 'गा कोकिळा गा' हा भावगीत, भक्तिगीत संग्रह, 'चांदोबा, वाघोबा, ससोबा' बालगीतसंग्रह प्रकाशनाच्या वाटेवर आहेत.

बाईंनी गद्य लिखाण केलं असलं तरी, त्यांचा मूळ पिंड कवीचाच. लहानपणापासून लेखनाला सुरुवात. 'पालखी' काव्यसंग्रहात काव्यविषयक कविता, प्रेमकविता, निसर्गकविता,

मृत्युविषयक कविता निरनिराळ्या छंदात, वृत्तात, मुक्तछंदात लिहिल्या आहेत. वरवर काव्याचे असे वर्गीकरण केले, तरी त्यांच्या सर्वच कवितांना जवळपास अध्यात्माची डूब आहे. 'पालखी'चे यथार्थ चित्रण केलेले आकर्षक मुखपृष्ठ, मलपृष्ठावर 'विसाव्यांचे' अभिप्राय. सुस्पष्ट सुरेख छपाई असे हे 'शारदा प्रकाशन', ठाणे यांचे दिमाखदार व दर्जेदार असे काव्याचे पुस्तक आहे.

'विसावा'बद्दल वि. स. खांडेकर यांनी म्हटल्याप्रमाणे साधी, सोपी, अर्थवाही, प्रसन्नशैली. मऊ मऊ वाळूवरून मजेत चालावं, कुठेही क्लिष्टतेचा काटा, अनुचित शब्दांचा खडा टोचायचा नाही. एखाद्या पुष्करिणीच्या काठी बसून तिच्या स्वच्छ पाण्याचा तळ पहावा तसा या काव्यातील आशयाचा आस्वाद वाचक घेऊ शकतो. अगदी हाच अभिप्राय त्यांच्या 'पालखी'बद्दलही (खांडेकर असते तर) त्यांनी दिला असता आणि रसिक वाचकांना तशीच अनुभूतीही आल्याशिवाय राहणार नाही. या संग्रहात रसिकांना कौटुंबिक सौहार्दाच्या, वात्सल्य, जिव्हाळा या जाणिवांच्या काव्यविषयक सामजिक मनाच्या अभिव्यक्तीच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीच्या अभिनिवेषाच्या तसेच सान्ताकडून अनंताकडे जाण्याची तीव्र ओढ लागलेल्या पारमार्थिक कविता आढळतील.

*जीवनाचा जोडीदार नको बोई कोणी मोठा*
*नको अमृताचा प्याला कधी लागावया ओठा*
*जीवनाचा जोडीदार हवा साधाच माणुस*
*सोने करील जन्माचे ज्याच्या प्रेमाचा परीस!*

'जीवनाचा जोडीदार'

ही कविता काय किंवा 'माझ्या घरीही येणार' पाहा.

*नको लपवू कलिका । पानाआड ग वल्लरी*
*नाही पडायची माझी । दृष्ट तुझ्या बाळावरी*
*नको चोरू माझ्यापुढे । उरी दाटलेला पान्हा*
*माझ्या घरीही येणार । आता गोकुळीचा कान्हा—* किंवा
*ती 'गीता' वाचित असता ही 'गीता' भक्ती असते*
*उद्बोधन श्रीकृष्णाचे शब्दात तिच्या अवतरते ।।*
*ती म्हणते स्थिर हो येथे ही म्हणचे जाऊ भूरऽऽ*
*ह्या जवळीकेतच जाते मी साध्यापासून दूर*
*परि हिच्यात श्रीकृष्णाचे मज सदैव दर्शन घडते ।।*

या अशा कौटुंबिक कवितांतही प्रपंच व परमार्थ हातात हात घालून नांदताना जाणवतात. त्यांच्या काव्यविषयक कविता अनेक आहेत. उदाहरणे द्यायचीच झाली तर 'शब्दाविना.'

*जिथे थांबतसे । ओघवती वाणी*
*तिथे मी लिहिते । आसवांनी गाणी ।।*

*जि़थे लोपतसे । माझाच मीपणा ।*
*तिथे मात्र सारे । सारे शब्दाविना ।।*

पहिलीच 'समाधी' कविता पाहा

*मी माझी असते अन् मी माझी नसतेही*
*शब्दांच्या मायेने भावब्रह्म फसतेही ।।*

त्यानंतर 'आसवांच्या अक्षरांनी' पाहा

*लिहायचे होती किती    अनवाणी अक्षराला*
*उमटेना शब्द एक    रस शब्दाचे येईना*
*अंधाराच्या आवरणी    अंतरीच्या आकान्ताचे*
*परी सुख हे क्षणिक    प्रतिबिंब उमटेना*

('तेंव्हा दिसे डोळा' ही पण अशीच अप्रतिम कविता-)

*लेखणीचे बळ    भाववेडे मन*
*शब्दाची शिकार क्षण आतुरते*
*करात ओंकार    विश्वही आत्मते*
*वसे माझ्या ।।    शब्दाविण ।।*

'स्वप्ने अनोखे'मध्ये,

*स्वप्न अनोखे असे उशाशी*
*भाव मधुरसे ओठी अडता*
*मूक होतसे वाणि परंतु*
*लिही लेखणी सुंदर कविता ।।*

'साक्षात्कार' या कवितेत-

*कुठली शक्ती करातुनी या भाव अनोखे विणते*
*शब्द, भाव, लेखणीसवे मी स्वत:च कविता बनते।।*

त्यांची 'अशी एकदा लिहीन कविता' पाहा–

*अशी एकदा लिहीन कविता*
*जी विश्वाची बनेल शिक्षक*
*जिचे अध्ययन करण्यासाठी*
*गुरुत्वही होईल समीक्षक।।*

कविता वाचायला सुरुवात करताक्षणीच या कवितेवर आद्य जेष्ठ-श्रेष्ठ असे आधुनिक मराठी कवितेचे शिल्पकार, बा. सी. मर्ढेकर यांच्या **'इरेस पडलो तर बच्चमजी। मुक्तछंद तर लिहीन मीही'** या कवितेची छटा दिसून येते.

आजच्या युगातल्या 'स्त्रीमुक्तिवादी,' 'स्त्री-पुरुष समानता'वाल्या, 'स्त्री स्वातंत्र्याचा' टेंभा मिरवणाऱ्या आजच्या 'स्त्री'चे चित्रण त्यांच्या 'मी कोण' या कवितेत यथार्थपणे उतरले आहे.

*मी कोण कुणास ठाऊक मलाच कळलं नाही ।।*
*मला स्त्री म्हणतात पण स्त्रीत्व बसले हरवून*
*सौंदर्याचा शापही उःशापाने सरवून*
*आठ वीसची लोकल पकडते जिवाचं करून रान*
*शालिनतेच्या सावित्रीने ताठ केलीय मान*
*संसाराचा रथ सावरीत पुरुषांबरोबर धावत्येय*
*उत्साहाचा उरुस सारा उरात जिरून जातोय*
*थकल्या भागल्या देहामध्ये त्राणच उरलं नाही ।।*

—शेवटी कवितेला आध्यात्मिक कलाटणी-

*कर्तव्याला कैवल्याची कुठलीच जाणीव नाही*
*मी कोण सांगायला मीच उरले नाही*
*मी कोण कुणास ठाऊक मलाच कळलं नाही।।*

सांताला अनंताची ओढ, जिवाला शिवाची ओढ, आत्म्याला परमात्म्याची ओढ त्यांच्या अनेक कवितांतून उत्कटतेने, प्रकर्षाने, आर्ततेने जाणवते.

'एकच मागणे'—

*शिशिराची पानझड गळे एक एक पान*
*तसा गतस्मृतींचाही धावे एक एक क्षण।।*
*सुखदुःखाचा गुंफला असा एक एक धागा*
*तुझ्या अंकावर आता हवी कायमची जागा*
*भक्तभागवता हवे आता मोक्ष सिंहासन।।*
'बंधन' -*अंधाराची कारा येथे। मळा प्रकाशाची आस*
*इथे सांताची शराब। मला अनंताचा ध्यास।।*

'शाप'- आजच्या विज्ञानयुगातला मानव अणुशक्तीचे अस्त्र घेऊन स्वतःचाच नाश करायला निघाला आहे. विज्ञानाला शाप की वरदान, म्हणायचे हा प्रश्न पडलाय मानवासमोर!

*संस्कृतीचा तरी मुखवटा*
*स्वार्थ द्वेष परि मनी विवस्त्र*
*विध्वंसाया विश्व निघाला*
*अणुशक्तीचे घेऊन अस्त्र।।*

'तोवरी कृतान्ता टाक आपुले पाश'

*हे मृत्यो तू त्याच वेळी ये जेव्हा*

*जोवरी विभव रवि माध्यान्ही आलेला*
*कीर्तिचा चंद्रमा झळकतसे पुनवेला*
*ओहोट जोवरी लागली न सुयशांस।।.*
(तोवरी कृतान्ता टाक आपुले पाश)

कवी भा. रा. तांबे यांच्या 'नववधू प्रिया मी बावरते' या कवितेतील मृत्यूला प्रियकर समजण्याची कल्पना व जीव हा नववधू अशा मृत्युविषयक अनेक प्रेमकविता 'पालखी'त आढळतील. त्यांपैकी

'तुला मला जाग यावी'

*तुला मला परी सख्या*
*जाग यावीच कशाला*
*झोपू असेच घेऊन*
*स्वप्न शर्वरी उशाला।।*

'शेवटची इच्छा'मध्ये त्या म्हणतात-

*येतोस ना? मी वाट पाहाते*
*तुझ्या अलौकिक मिठीत घेतोस ना?*
*मी वाट पाहते।।*
*भैरव सरला सरे भैरवी*
*उमाळ्यावरी यायचा रवी*
*शब्द सुराविण गीत तुझे गातोस ना?*
*मी वाट पाहते।।*

'तुझी माझी प्रीत'-

*तुझी माझी प्रीत सख्या*
*विश्वाच्याही पल्याडची*
*साऱ्या वैश्विक वैभवा*
*भीती प्रलय काळाची।।*

'नवा उमलला अर्थ'

*सागराची लाट निघे उंच नभाला भिडाया*
*तिच्याहून झेप माझी राया तुझ्याकडे याया*
*वारा वाहता वाहता त्रैलोक्याशी जोडी नाते*
*तुझी विश्वात्मक शक्ती माझ्या आत्म्यात नांदते।।*

या संग्रहातील 'पालखी' ही अखेरची शीर्षककविता. 'साळुंकी साळकी तुझी माझी पालखी' हा खेळ मंगळागौरीतला. अविद्या व माया (दोन मुली हा खेळ खेळतात.) हा खेळ



अनुक्रमणिका

गिरक्या घेत तल्लीनतेने खेळत आहेत.

*तू मी दोघीजणी आहो तरी दोन का?*
*वर्तुळाला एकाएकी आला नवा कोन का?*
*चुटक्या वाजवीत गिरक्या घेत पालखी पुढे जाते आहे*
*कुणी म्हणतात काय जाणे तुझे माझे नाते आहे*
*प्रकाशाच्या प्रासादात भिंगरीसारख्या फिरत आहो*
*उन्मादाच्या बेहोशीत अनंतात विरत आहो*
*क्षणामध्ये मूक होते वागीश्वरी बोलकी ।।*

'घट म्हणजे ही केवळ माया', 'आता न सांगण्या उरले', 'परि, तेव्हा दिसे डोळा', 'रक्ताने न्हाली इतिहासाची पाने', 'संसाराचा रथ', 'ॐकार', कशी 'मीच,' 'प्रीतीचे आकाश माझे' इ. अनेक अप्रतिम कविता यात आहेत. त्यासाठी रसिक वाचकांनी 'पालखी' काव्यसंग्रह वाचावयास हवा. तो अल्लद पावले थिरकवीत. 'पालखी'बरोबर जाता जाता चालण्याचे श्रम न जावणता एका वेगळ्या अनंताच्या अनोख्या विश्वात नेऊन सोडील....

---

## साभार पोच

**मनमोर :** माया दिलीप धुप्पड, अमीत प्रकाशन, जळगाव, पृष्ठे ८०
**निवडणुकीत भैरू :** उत्तम कांबळे, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १४६
**अल तमीर :** विश्राम गुप्ते, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २९०
**आठ दीर्घ कथा :** अनुवाद सुमती कानिटकर, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २१२
**भाबडी :** जालंदर सोनुने, प्रबोधन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११०
**संजीवन आहार :** श्रीराम वझे, शुभांगी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ८६
**भुईफुल :** विजय शं. माळी, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६६
**चिंतन (सार्वजनिक ग्रंथालयाचे) :** मुकुंद अनगळ : ग. म. भ. न. प्रकाशन, पुणे, पृष्ठे १००
**कालस्य कारणम्, धनराज वंजारी :** आकार पब्लिकेशन, मुंबई, पृष्ठे ६८
**व्यसनापासून सुटका :** लेखक व प्रकाशक डॉ. वि. वि. घाणेकर, पृष्ठे ११०
**वेद व भक्तिमार्ग :** लेखक व प्रकाशन डॉ. वि. वि. घाणेकर, पृष्ठे १२०
**लक्ष्मीचे देणे :** नलिनी महाडीक, प्रकाशक रवींद्र महाडिक, सातारा, पृष्ठे १५६
**अमृतधार (२ रा खंड) :** बाळासाहेब जांभळे, पंकज प्रकाशन, बेळगाव, पृष्ठे ४८०
**घडई :** दाजीबा रायभोळे, आरती प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे २३४
**बांगड्यांची खैरात :** शर्मिला गोसावी, मधु प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४
**ठोकर :** अरुण श्रीखंडे, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५०
**सावरलेला डाव :** अरुण श्रीखंडे, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे २०८
**गवसणी आकाशा :** संगीता वैद्य, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३६

## श्वेतकमळ

श्वेतकमळ-मराठी काव्यसंग्रह (प्रा. कृष्णा चौधरी, पूर्वा प्रकाशन, रामटेक, जिल्हा-नागपूर, मूल्य-५०/- रु.)

प्रा. कृष्णा चौधरी या विदर्भातील रामटेकच्या कॉलेजातून मराठी विभागप्रमुख म्हणून निवृत्त झालेल्या प्राध्यापक कवीचा 'श्वेतकमळ' हा दुसरा काव्यसंग्रह. या आधी १९७० मध्ये त्यांचा 'झळई' हा कविवर्य अनिल यांची प्रस्तावना व प्राचार्य या. मु. पाठक यांचे आशीर्वाद लाभलेला काव्यसंग्रह. 'नवकलिका' (प्रातिनिधिक काव्यसंग्रह संपादन) १९६०, 'अग्निकमळ' (राम शेवाळकर व कृष्णा चौधरी संपादित) १९९१ असे दोन काव्यसंग्रहांचे संपादनही यांनी केलेले आहे.

प्रदीर्घ काळानंतरच्या या काव्यसंग्रहाला चौधरींचे गुरू डॉ. प्रा. द. भि. कुलकर्णी यांची प्रस्तावना आहे. यांच्या कविता 'सत्यकथा', 'अनुष्टुभ', 'अभिरुची', 'प्रतिष्ठान', 'युगवाणी'मधून पूर्वप्रसिद्धी मिळालेल्या आहेत. एके काळच्या नवसाहित्याच्या अग्रणी म्हणून गणलेल्या मासिकांतून कविता प्रसिद्ध होऊन, पहिल्याच संग्रहाला अनिलांची प्रस्तावना लाभूनही हा कवी दुर्लक्षितच राहिला. 'झळई' या त्यांच्या उमेदींच्या काळातल्या काव्यसंग्रहातून दर्शन घडले ते त्यांच्या नैराश्याचे, अज्ञाताच्या ओढीचे आणि अज्ञाताच्या झळींचे. ही जिव्हारी लागलेली झळ भावनिक असून त्यात त्यांची कल्पकता, संयम, रेखीव अभिव्यक्ती व आत्मनिष्ठा सुस्पष्ट जाणवते. चौधरींच्या पहिल्या काव्यसंग्रहातील कवितेवर कोणत्याही प्रथितयश कवीच्या काव्याचा प्रभाव पडलेला नाही. याचे कारण बहुधा अनुकरणाच्या मोहात त्यांची कविता सापडली नाही हेच असावे.

तरी पण 'श्वेतकमळ' या दुसऱ्या काव्यसंग्रहातील कवितांवर बा. सी. मर्ढेकर व विंदा करंदीकर यांच्या काव्याचा प्रभाव बऱ्याच प्रमाणात जाणवतो. उदाहरण द्यायचे झाल्यास त्यांची 'मांडव' ही कविता पाहा-

*आता भैरवाने भोळ्या*
*स्वैर करावे तांडव*
*पेटव गा, आता तरी*
*उभ्या जगाचा मांडव!*

या ओळी मर्ढेकरांच्या

*असशील भोळ्या कुठे भैरवा*
*उघड तुझे तर तीनही डोळे,*
*भस्म करी गा, आता तरी हे—*
*हे हाडांचे खडे सापळे!*

या ओळींची सही सही नक्कल वाटते.










'ओढ', 'सोड माझ्या दु:खासह', 'चांदण्यात', 'कहाणी', 'पाखरू' 'आला श्रावण तरीहि', 'सांज आली', 'शिरीषाचे फूल' इ. कवितांतून चौधरींचीच कविता उत्स्फूर्तपणे बहरलेली जाणवते.

त्यांची 'शेजार' कविता पाहा.-

*देह झाला देहू । प्राण हा आळंदी*
*वैष्णवांची नांदी । सोबतीला ।।*
*दिंड्या पताकांचा । खांद्यावरी वरी भार ।*
*अखंड शेजार । विठोबाचा ।।*

कवीचे जास्त प्रमाणत आयुष्य वरुड, साकोळी-रामटेक अशा ग्रामीण भागात गेले आहे. त्यामुळे कवीने आपला सांस्कृतिक वारसाही जपलेला अशा कवितेतून जाणवतो. 'श्वेतकमळ'मध्ये कार्ल मार्क्स व डॉ. आंबेडकरांवर कविता आहेत. 'झळई'मध्ये केशवसुतांवर. त्यांच्या या कवितांमधून कवीची जीवनमूल्ये, निष्ठा प्रकट होतात.

चौधरींची कविता साधी-सरळ, तरीही कुठे कुठे प्रतिमासृष्टीने नटलेली, गाभुळलेली, झाकोळलेली अशी आहे. तिला शब्दसोस नाही. पण नव्या परिमाणांचा ध्यास आहे. ती केशवसुती वळणाचीही नाही व दलित संप्रदायाचीही नाही. ती अनिल, तांबे, मर्ढेकर, करंदीकर, कुसुमाग्रज यांच्या पठडीतली आहे.

*माझा इवलासा देह*
*तुझी आकाशाची झेप*
*कटाक्षानेही जळेल*
*काल लाविलेले रोप*

'बळ' या कवितेतील या ओळी तसेच त्यांच्या 'प्रवास' या कवितेतील ओळी

*नाही कळत कधीही*
*इथे दु:खाचे कारण*
*रूक्ष वाळवंटी चाळे*
*मानवाची वणवण*

किंवा 'देवद्वार' ही संपूर्ण कविताच विशेषत: या ओळी

*'ओंजळीत येईचना*
*खळ्यातले दाणे*
*कुंतीचीच व्यथा मागे*
*माझे वांझ गाणे'*

यातून कवीच्या अंतर्मनातील अश्वत्थाम्याची भळभळणारी दु:खाची जखम, तीव्रपणे ठसठसणारी, अनामिक संवेदना, रसिकांना अस्वस्थ करतात. 'डोंगर' ही कविता त्याचे



अनुक्रमणिका







मूर्तिमंत, जिवंत उदाहरण.

अभिरुचिनिष्ठ काव्येतिहास लिहिला जाईल तेव्हा म. य. देशपांडे, प्रभाकर शिरास, गायधनी, श्रीधर शनवारे या कवींप्रमाणेच कवी कृष्णा चौधरी यांचेही नवमूल्यमापन होईल व त्यांच्या कवितेतील सहजसुंदर प्रतिमासृष्टी, प्रतीतिधर्म, आत्मनिष्ठा रसिकांना जाणवेल असा आशावाद व (आशीर्वादही) डॉ. द. भि.नी व्यक्त केला आहे.

आपल्या मनोगतात कवीने 'श्वेतकमळ' याचा अर्थ स्पष्ट करून सांगितला आहे. अथर्ववेदात मनुष्याच्या हृदयालाच 'श्वेतकमळ' असे संबोधले आहे. कमळ म्हणजे पिंड, ब्रह्मांडाचे प्रतीक. ते विश्वोत्पत्तीशी मिळतेजुळते आहे. म्हणजे सृजनाशी. बुद्धाचे आसनच कमळ. त्याच्या पावलागणिक कमळे फुलतात. त्यांच्या 'प्रतोद' कवितेत–

*इथे तर रोज अन्यसंस्कृतीचा खिंकाळतो आहे घोडा*
*'धम्मा'च्या पावलांनी कसे उमलायचे?*

'प्रवास'मध्ये म्हणतात-

*तू म्हणजे एक अपार्थिव निरागस अच्छोद सरोवरातील 'श्वेतकमळ.'*

श्वेतकमळ म्हणजे चंद्रविकासी कमळ. स्त्रीत्व, जीवोत्पादन शोभा, शाश्वतजीवन, शुचित्व. या अर्थच्छटांच्या भाववृत्ती 'श्वेतकमळ'मध्ये रसिकांना जाणवाव्यात. हा कवीचा साफल्याचा आनंद आहे, असे कवीने म्हटले आहे.

'कधितरी' या कवितेत परमात्म्याच्या भेटीची तीव्र आस, तो खरंच कधीतरी दाराशी येईल आणि आत्मा-परमात्मा मीलनाचा क्षण येताच, 'मन जवळ यावया गांगरते' या तांबे याच्या ओळीप्रमाणे चौधरी म्हणतात–

*असा आज अचानक*
*क्षण मीलनाचा येता*
*का हे गोंधळते मन*
*तूच सांग विश्वनाथा*

अशा अनेक कवितांवर तांबे यांची व अनेक कवितांवर मर्ढेकर यांची छाप आहे.

'झळई'मधून जाणवणारी अज्ञाताची ओढ 'श्वेतकमळ'मध्ये अधिक तीव्र झालेली प्रतीत होते. नैराश्याची गडद झाकोळ, कुठे चिखलाच्या खोल गर्तेत, कधी वात्रटळीने उडणारा पाला-पाचोळा, अज्ञाताचा मार्ग काळ्याकुट्ट ढगांनी अंधारलेला, अशा भावच्छटा 'श्वेतकमळ'मध्ये जाणवतात.

'संध्याकाळ' या प्रतीतिधर्मी कवितेतील शेवटच्या ओळी याची साक्ष देतील.

*हे कृपासिंधू!*
*मला विरघळून टाक ना तुझ्या अजस्त्र मिठीत*
*प्रश्न निर्माण होण्याआधीच!*



अनुक्रमणिका

'आण'मधील या ओळी

*अरे पांडुरंगा! तुझे*
*इथे पाठवी विमान*
*तुकयाच्या अभंगाची*
*टाळ गोधडीची आण*

'चंद्र', 'किनारा', 'श्रावण', 'बळ', 'नाळ', 'अंतरा', 'आयुष्य' अशा काही कविता रसिकांना निश्चितच भावतील.

**आशा भिडे**
B/९, विजय अपार्टमेंटस्, 'आराधना' टॉकीजजवळ, ठाणे (प) ४००६०२
दूरभाष : २५४१०१४०

❑

---

## साभार पोच

**मातृऋण :** उज्ज्वला, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८४
**मराठी चित्रपट सृष्टीचे अध्वर्यू राजा परांजपे,** : मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११०
**चैतन्याचा झरा :** सुखदा ऋषी, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११६
**संवेदना :** सुनीता धारवाडकर, मैत्र प्रकाशन, पुणे : पृष्ठे ७२
**टिनपाट प्रेम :** गवळण कलकत्ते, स्वत: लेखक प्रकाशक, पृष्ठे १२८
**त्रिधा :** रंगनाथ पठारे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे २५२
**तिची गोष्ट :** प्रभा बैकरू, अमृत प्रकाशन, जळगाव, पृष्ठे १०८
**फरपट :** सुचिता बर्वे, अभिषेक टाईपसेटर्स आणि पब्लिशर, पुणे, पृष्ठे ३०८
**संगीत यात्रा :** बंदिश विभाग, रोचना भडकमकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८४
**रागदारी संगीतातील :** सौंदर्यस्थळ, रोचना भडकमकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३४
**नाममहिमा :** गौरी सुहास नामजोशी, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २२८
**चित्रमाधुरी :** म. वि. गोखले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०
**विसाव्या शतकातील मराठी समीक्षा :** संपादन विलास खोले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २०८
**तळ्यात मळ्यात :** पद्मावती जावळे, योगीता प्रकाशन, पुणे ९, पृष्ठे ८८
**पुनरुथ्यान :** पद्मावती जावळे, योगीता प्रकाशन, पुणे ९, पृष्ठे १५२
**आंबट चिंबट :** माधव चुकेवाड, शिव पब्लिशर्स पुणे, पृष्ठे ५२
**एकूण १ :** सुनील गोडसे, विचित्र निर्मिती, पुणे, पृष्ठे ८८
**खेळता खेळता :** विनिता पिंपळखरे, नाट्य प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८४
**चंद्रवेल :** विनिता पिंपळखरे, स्पर्श प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४

# शोकविव्हल करणाऱ्या स्त्री-जीवनाची एक कहाणी



**म. श्री. दीक्षित**

(फरपट : सौ. सुचिता बर्वे, प्रकाशक : मंगेश र. वाडेकर अभिषेक पब्लिशर्स, खुन्या मुरलीधराजवळ, पुणे ३०. किं. रु. २५०.)

सौ. सुचिता बर्वे यांची 'फरपट' ही कादंबरी म्हणजे टिळकयुगातील पुरुषी वर्चस्व असणाऱ्या एका ब्राह्मण कुटुंबातील स्त्रीची शोककहाणी आहे. या स्त्रीचा पती उच्चशिक्षित असतो, पणं वृत्तीने अत्यंत चंगीभंगी असतो. स्त्री म्हणजे एक उपभोग्य वस्तू असा त्यांचा दृष्टिकोन. लग्नापूर्वी त्याचे अनेक स्त्रियांशी संबंध आलेले असल्यामुळे स्वपत्नीला प्राय: रोज रात्री तो अतोनात छळत असे. खादाड, संशयी आणि कामांध पती वाट्याला आल्यामुळे 'असे पती देवचि ललनांना' असणाऱ्या काळात कादंबरीच्या नायिकेला किती सोसावं लागलं असेल याची कल्पनाच करवत नाही.

आत्मनिवेदनात्मक पद्धतीने लिहिलेल्या प्रस्तुत कादंबरीत पुरुषप्रधान ब्राह्मण कुटुंबाचं केलेलं चित्रण केवळ वास्तववादीच नव्हे तर विदारक, चटका लावणारं आहे. पुरुषी वर्चस्वाच्या जुन्या काळात कुटुंबात दहावीस माणसं असत. एखादी सकेशा वा विकेशा स्त्री हमखास असे. आठव्या, दहाव्या वर्षी मुलींची लग्ने होत. बिजवराला मुलगी देण्यात कुणाला काहीच वाटत नसे. सासरी जो सासुरवास नि कष्टाची कामे करावी लागत त्याला काही सीमाच नसे. बायकोला मारहाण करण्यात तर मोठा पुरुषार्थ समजला जाई. विशेष म्हणजे घरात सासूबरोबर नणंदा किंवा इतर सकेशा-विकेशा पोक्त स्त्रियाही नव्या नवरीला घालूनपाडून बोलून वा कामे सांगून छळत असत. पुरुषांइतक्याच घरातील इतर स्त्रियाही नव्या नवरीच्या छळवादात सामील असाव्यात; याचा अर्थ स्त्रियासुद्धा स्त्रीच्या वैरी असत हा त्या कुटुंबसंस्थेला लागलेला कलंक होता. नवऱ्यापासून ते घरातील नणंदेपर्यंत सर्वांकडून नवविवाहितेचा कसा छळवाद होत असे याचे हृदयभेदक चित्र उभे करण्यात सौ. सुचिता बर्वे नक्कीच यशस्वी झाल्या आहेत.

'फरपट' मधील नायिका 'एकच प्याला'तील सिंधूप्रमाणे अतिशय सोशीक दाखवलेली आहे. आश्चर्य असे की, नायिका चांगली शिकलीसवरलेली, पोक्त नि सुधारकी विचारांची असूनसुद्धा कामांध, पशुतुल्य नवऱ्याबरोबर छत्तीस वर्षे संसार करीत राहते, पोराबाळांचे



अनुक्रमणिका






जमेल तसं संगोपन करते, कधी माहेरी बाप्पाकडे जाते आणि फिरून बुभुक्षित नवऱ्याकडेच येऊन राहते. अतिशयोक्ती वाटावी अशा तिच्या नवऱ्याच्या अगाध लीला असतात. संशय घेणे, कोंडून ठेवणे, मारहाण करणे, डाग देणे, तिची गावभर बदनामी करणे आणि भरीला रात्री मन:पूत उपभोग घेणे या प्रकारांची कादंबरीत अनेक उदाहरणे, खरे तर नको इतक्या तपशिलाने वाचायला मिळतात. त्यामुळे 'फरपट' कादंबरी पसरट, काहीशी विस्कळीत झाली आहे. कादंबरीतील कुटुंबचित्रण कोकणस्थ या पोटजातीचं आहे. त्यामुळे कोकणस्थांच्या चिकटपणाचं दर्शनही या कोकणस्थ लेखिकेने घडविले आहे. (असे चिकट लोक सर्व जातिजमातीत असतात.)

'फरपट' कादंबरी ही खरे तर ना कादंबरी, ना चरित्र, की ना आत्मचरित्र अशा स्वरूपाची एका स्त्रीच्या छळवणुकीची कहाणी म्हणावी लागेल. कहाणी हा वाङ्मयप्रकार जुन्या काळात होता. तो आटोपशीर, उपदेशात्मक असे. सौ. सुचिता बर्वे यांनी 'फरपट' सारखी दीर्घ कहाणी लिहून एकप्रकारे जुन्या कहाणीवाङ्मयाचा पुनरुद्धारच केला असे म्हणावेसे वाटते.

या कहाणीची नायिका सुधारकी-पुरोगामी विचारांची असून ती आपले कटु अनुभव सांगताना अधूनमधून जी भाष्यवजा टिपणी करते ती फार बोधप्रद आहे. उदा. पृष्ठ १५४ वरील बुद्धी आणि भावना यांवरील भाष्य. भूतकाळाबरोबर या कादंबरीत वर्तमानकालीन स्थितीचाही वेध घेतलेला आहे. कामपिपासू नवऱ्याच्या कचाट्यातून सुटका होण्यासाठी कामपूर्तीच्या एखाद्या शोधाची मार्गप्रतीक्षा करण्यापर्यंत तिच्या विचारांची झेप आहे. लीला पाटील, द. धों. कर्वे, श्री. म. माटे, ग. दि. मा., समर्थ रामदास, रणजित देसाई, डॉ. वाय. व्ही. फाटक, डॉ. भडकमकर, आ. उभे, इतिहासाचार्य राजवाडे, इतकेच नव्हे इंग्लंडची डायना इत्यादी अनेक व्यक्तींचे विचार आणि कृती यांचे उल्लेख कादंबरीत येतात. जोशी-अभ्यंकर खुनाचा खटलाही वर्णनातून सुटलेला नाही.

मागासलेला भूतकाळ आणि सुधारलेला वर्तमानकाळ अशा पार्श्वभूमीवर दुर्दैवाचे दशावतार सोसाव्या लागणाऱ्या एका अभागिनीची प्रस्तुत संसारकथा लांबट-पसरट झाली असली तरी वाचकाला विलक्षण चटका लावेल यात शंका नाही. श्री. सविता भावे यांनी आपल्या छोट्या मार्मिक प्रस्तावनेत 'ही कादंबरी बऱ्याच अंशी सत्यकथाच असण्याची शक्यता आहे' असे अर्थपूर्ण वाक्य लिहिले आहे. मलाही ते अर्थपूर्णच वाटते. कादंबरीच्या मुखपृष्ठावर पालथा घडा शेजारी ठेवून हातपाय पसरून बसलेल्या स्त्रीचे चित्र आहे. ते कादंबरीच्या एकूण कथानकाशी विसंगत भासते. निर्भीडपणे आणि मोकळेपणाने पुरुषी वर्चस्वाखाली दडपलेल्या एका अभागी स्त्रीची ही कहाणीवजा कादंबरी लिहिल्याबद्दल सौ. सुचिता बर्वे यांचे अभिनंदन.

**म. श्री. दीक्षित**

❑

अनुक्रमणिका

# कार्यवृत्त

**आहिताग्नी राजवाडे स्मृतिदिन :**

शनिवार दि. २७-११-२००४ रोजी आहिताग्नी राजवाडे स्मृतिदिनानिमित्त डॉ. शं. रा. तळघट्टी यांचे 'भारतीय तत्त्वज्ञानातील ज्ञान आणि भक्ती' या विषयावर व्याख्यान झाले. भारतीय तत्त्वज्ञानात ज्ञानाबरोबरच भक्तीलाही कसे महत्त्व आहे, हे त्यांनी सांगितले. या प्रसंगी परिषदेचे प्रमुख कार्यवाह, रवींद्र भट यांनी प्रास्ताविक केले. स्थानिक कार्यवाह डॉ. मिरदेव गायकवाड यांनी आभार मानले.

**माधव जूलियन स्मृतिदिन :**

सोमवार दिनांक २९-११-२००४ रोजी माधव जूलियन स्मृती दिनानिमित्त ज्येष्ठ आणि नवोदित कवींचे काव्यवाचन आयोजित केले. या कविसंमेलनात मंजुषा आचरेकर, शिरीष सुमंत, ऋचा घाणेकर, वैशाली क्षीरसागर, संध्या पाटील, अश्विनी गुरव, प्रमोद खराडे, भाग्यश्री कुलकर्णी, जान्हवी जोगळेकर, मानसी जोशी इत्यादी सहभागी झाले होते. 'प्रेम' हा विषय सर्व कवींना दिला होता. सर्वांनीच प्रेमभावनेतील विविध छटांवर आपल्या कविता सादर केल्या.

कार्यक्रमाच्या सुरुवातीला कार्यवाह डॉ. मिरदेव गायकवाड यांनी ज्येष्ठ कवी शंकर रामाणी आणि वासंती मुजुमदार यांना श्रद्धांजली अर्पण करण्याचा ठराव मांडला व सर्वांनी त्यांना श्रद्धांजली अर्पण केली. त्यानंतर डॉ. मिरदेव गायकवाड यांनी आपल्या प्रास्ताविकात माधव जूलियन यांच्या प्रेमकवितेविषयी थोडक्यात माहिती दिली.

डॉ. मिरदेव गायकवाड यांनी कविसंमेलनाचे सूत्रसंचालन केले.

**श्री. म. माटे स्मृतिदिन :**

शनिवार दिनांक २५-१२-२००४ रोजी श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचे कै. माटे यांचे साहित्यिक कार्यकर्तृत्व या विषयावर व्याख्यान झाले. माटे यांचे जीवनकार्य आणि लेखनकार्य परस्परपूरक होते, हे त्यांनी आवर्जून सांगितले.

या वेळी परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले.

## विभागीय साहित्य संमेलन

म. सा. परिषदेच्या खेड (जि. रत्नागिरी) शाखेच्या वतीने दि. १५ जानेवारी, २००५ रोजी ११ वे विभागीय साहित्य संमेलन ख्यातनाम साहित्यिक मा. ह. मो. मराठे यांच्या

अध्यक्षतेखाली पार पडले. स्वागताध्यक्ष श्री. हिराचंद्रभाई बुटाला हे होते. संमेलनाचे उद्‌घाटन माजी गृहराज्यमंत्री रामदासभाई कदम यांच्या हस्ते झाले.

ग्रंथदिंडी, पुस्तक प्रदर्शन, विविध परिसंवाद, कविसंमेलन याबरोबरच विविध गुणदर्शनाचे कार्यक्रमही झाले. तसेच केशवसुत स्मृतिशताब्दी निमित्ताने केशवसुतांना भावपूर्ण आदरांजली वाहण्यासाठी 'सुनित' ही स्मरणिकाही प्रकाशित करण्यात आली.

कविसंमेलन, 'वाचन संस्कृती हरवली आहे काय?' 'स्त्री साहित्यिक : काल, आज, उद्या' यासारखे परिसंवाद, करमणुकीचे कार्यक्रम इत्यादी कार्यक्रमांनी संमेलन परिपूर्ण झाले. या संमेलनात अनेक मान्यवर आवर्जून उपस्थित राहिले. डॉ. गं. ना. जोगळेकर, रवींद्र भट, मो. ग. धडफळे, म. श्री. दीक्षित, विश्वास मेहेंदळे, वि. भा. देशपांडे, सुधीर गाडगीळ, डॉ. मिरदेव गायकवाड, डॉ. कल्याण इनामदार, डॉ. माधवी वैद्य, विद्या बाळ, दीपा श्रीराम या आणि यांच्यासारख्याच अन्यही नामांकित व्यक्तींमुळे संमेलन संपन्न झाले. या साहित्य संमेलनाच्या सांगता समारंभासाठी रत्नागिरी जिल्ह्याचे कलेक्टर संतोषकुमार अमराठी असूनही मराठीवरील प्रेमापोटी उपस्थित राहिले. पसायदानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

**डॉ. मिरदेव गायकवाड**

कार्यवाह.

■

## शाखा इचलकरंजी

### महाराष्ट्र साहित्य परिषद, जिल्हास्तरीय कविसंमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा इचलकरंजीतर्फे 'मसाप'च्या शताब्दी वर्षानिमित्त, तसेच श्रेष्ठ कवी केशवसुत स्मृती शताब्दी वर्षाचे औचित्य साधून दि. ३ जानेवारी २००५ रोजी पं. बाळकृष्णबुवा स्मृति-मंदिर, इचलकरंजी येथे जिल्हास्तरीय उदयोन्मुख कवींच्या कविसंमेलनाचे आयोजन करण्यात आले. केंद्रीय कार्यकारिणीचे कार्यवाह डॉ. मिरदेव गायकवाड व मसाप परीक्षा विभागप्रमुख डॉ. कल्याण इनामदार यांच्या मार्गदर्शन व परीक्षणाखाली केंद्रीय मसाप तर्फे शताब्दी वर्षानिमित्त पुणे येथे होणाऱ्या स्पर्धेसाठी स्पर्धकांची प्राथमिक फेरीही याच वेळी घेण्यात आली.

यावेळी पन्नासहून अधिक कवींनी 'काव्यवाचन' करून भरगच्च उपस्थिती लावलेल्या काव्यरसिकांकडून भरभरून दाद मिळविली.

डॉ. इनामदार यांनी पारितोषिक वितरणप्रसंगी कवितेबद्दल आपले विचार मांडून नवोदितांना मार्गदर्शन केले व काही कविता सादर करून रसिकांची भरभरून दाद मिळविली. तर डॉ. गायकवाड यांनी "कवितेमध्ये सूचकता महत्त्वाची असते. तसेच काव्याने रंजन करण्याबरोबर उद्‌बोधनही करणे आवश्यक आहे," असे मत व्यक्त केले. मसाप शाखा अध्यक्ष ॲड. सत्यनारायण ओझा यांनी अध्यक्षीय मनोगतातून काव्याचे रसग्रहण केले.

काव्य संमेलनाच्या प्रारंभी पाहुण्यांचे व उदयोन्मुख कवी व रसिकांचे स्वागत शाखा कार्याध्यक्ष राजन मुठाणे यांनी केले, तर प्रस्तावना पुणे कार्यकारिणी सदस्या सौ. वैशाली नायकवडे यांनी केली.

**राजन मुठाणे**

कार्याध्यक्ष,

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा– इचलकरंजी.

■

## धुळे जिल्हा शाखा.

(१) दि. २७.०७.२००४ रोजी राजर्षी छत्रपती शाहू महाराज जयंतीनिमित्त औरंगाबादच्या विवेकानंद महाविद्यालयातील पदव्युत्तर भाषा विभागाचे अधिष्ठाते व ख्यातनाम साहित्यिक डॉ. दादा गोरे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. अध्यक्षस्थानी प्राचार्य मा. य. वैद्य होते. प्रमुख पाहुणे म्हणून आमदार राजवर्धनजी कदमबांडे, गरुड वाचनालयाचे अध्यक्ष मा. आनंदराव साळुंखे हे होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. दिलीप चव्हाण यांनी केले. प्रास्ताविक कविवर्य पुरुषोत्तम पाटील यांनी, व आभार प्रा. सौ. शेलकर यांनी मानले.

(२) दि. १४ ऑगस्ट ०४ रोजी बालकवी ठोंबरे व प्र. के. अत्रे स्मृतिदिनानिमित्त सुप्रसिद्ध साहित्यिक व कवी किशोर पाठक (नाशिक) यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. अध्यक्षस्थानी गरुड वाचनालयाचे अध्यक्ष मा. आनंदराव साळुंखे हे होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रा. डॉ. सौ. शशिकला पवार यांनी केले तर आभार प्रा. आशुतोष पाटील यांनी मानले. परिचय श्री. मोहन मोरे यांनी, करून दिला. सूत्रसंचालन श्री. गणेश पाठक यांनी केले.

(३) दि. ३१ ऑक्टोबर, २००४ रोजी खानदेशचे सुप्रसिद्ध साहित्यिक प्राचार्य कै. अनंतराव पाटील स्मृतिदिनानिमित्त ख्यातनाम विचारवंत प्रा. (डॉ.) र. बा. मंचरकर (अहमदनगर) यांचे 'समर्पणमयी सीता' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कवितारतीचे संपादक, प्राचार्य पुरुषोत्तम पाटील हे होते. प्रास्ताविक प्रा. (डॉ.) सौ. शशिकला पवार यांनी केले. परिचय प्रा. आशुतोष पाटील, तर आभार मोहन मोरे यांनी मानले.

**मोहन मोरे**

कार्यवाह.

## ठाणे जिल्हा शाखा

रविवार दि. १२.१२.०४ रोजी, दिवसभर विख्यात लेखिका, 'सानिया' यांच्या वाङ्मयावर त्यांच्या उपस्थितीत (एक दिवसाचे) चर्चासत्र आयोजित केले होते. चर्चक व विषय होते. १) डॉ. हरिश्चंद्र थोरात, 'सानिया यांच्या कथात्मक साहित्यातील निवेदक,' २) डॉ. पुष्पा












राजापुरे-तापस-'सानिया यांचे कथालेखन,' ३) प्रा. मीनाक्षी दादरावाला-'सानिया यांच्या कथेतील स्त्री,' ४) नीलिमा पालवणकर-'सानिया यांचे कादंबरी लेखन.' अध्यक्षस्थानी डॉ. सुधा जोशी होत्या. सानिया यांनी यावेळी चर्चेत भाग घेतला. यावेळी प्रा. अंबिका सरकार उपस्थित होत्या. त्यांनीही आपली निरीक्षणे यावेळी नोंदवली.

**पद्माकर शिरवाडकर,**
कार्यवाह.

## शाखा जळगाव

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा, जळगाव आणि 'पान फुल प्रकाशन' यांच्या संयुक्त विद्यमाने साहित्यिक जगन्नाथ धनसिंग यांच्या 'गुजरी तोडी' या पुस्तकाचे प्रकाशन रेल, ता. धरणगाव, येथे दि. २६-९-२००४ ला जळगाव आकाशवाणीचे निदेशक माननीय अनिल देशमुख यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष, नारायण शिरसाळे होते.

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जळगावच्या तर्फे अध्यक्ष नारायण शिरसाळे यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४-१०-२००४ ला नू.म. महाविद्यालयाच्या सभागृहात भगवान भटकर, प्रा. मधुकर साळुंखे, उपाध्यक्ष प्रा. शा. न. पाटील, कवी पुरुषोत्तम नारखेडे, विष्णुकांत जडे, कार्याध्यक्ष प्रा. दिनेश पाटील यांनी 'चेत 'चे प्रकाशक श्री. वा. रा. सोनार, कवी अरुण कोलटकर, ठुमरी गायिका शोभा गुर्टु व समीक्षक भालचंद्र फडके यांना श्रद्धांजली वाहिली.

कवीश्रेष्ठ केशवसुत जन्मशताब्दी निमित्ताने दि. ७-११-२००४ ला (रविवारी) दुपारी चार वाजता नू.म. महाविद्यालयाच्या सभागृहात कवी नारायण शिरसाळे यांच्या अध्यक्षतेखाली जिल्ह्यातील मान्यवर कवींचे काव्यसंमेलन आयोजित करण्यात आले होते. कवी केशवसुत यांच्या निधनास ७-१०-२००५ ला १०० वर्षे पूर्ण होत आहेत. आमंत्रित कवींनी तुतारी, शब्दांनो, मागुते या, अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न, वातचक्र इत्यादी केशवसुतांच्या कविता म्हटल्या. याशिवाय कवी शशिकांत हिंगणेकर यांनी 'कविता, तुमच्या विद्यापीठात' (नारायण सुर्वे), कवयित्री सुशिल पगारिया यांनी 'भोवती', 'मृत्युपत्रात', कवी बी. डी. शिंदे यांनी 'पाऊस', 'झांजर', 'शापित', कवी चंद्रकांत मोरे यांनी 'ऋतुगंधा', 'अस्वस्थ' कवी विलास मोरे यांनी 'गौडमित्रा' अशा कविता सादर केल्या.

या काव्यमैफिलीचे सूत्रसंचालन प्रा. दिनेश पाटील यांनी केले.

**प्रा. दिनेश पाटील,**
कार्याध्यक्ष, म.सा.प., जळगाव.

❑

## पारितोषिके व स्मृतिदिन

**६ ऑक्टो. २००४ : द. वा. पोतदार पारितोषिक**

कै. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनानिमित्त परिषदेतर्फे रु. १०००/-चे पारितोषिक इतिहासविषयक किंवा तत्सम पुस्तकास दिले जाते. यावर्षी विद्या गाडगीळ (ठाणे) यांना 'तंजावरचे मराठी राज्य आणि संस्कृती' या पुस्तकासाठी हे पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. रवींद्र लोणकर होते. परीक्षकांच्या वतीने डॉ. कमलाकर श्रीखंडे यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. मिरदेव गायकवाड यांनी आभार मानले.

**९ ऑक्टोबर २००४ : विद्याधर पुंडलिक पारितोषिक**

कै. विद्याधर पुंडलिक यांच्या स्मृतिदिनानिमित्त परिषदेतर्फे रु. १०००/- चे पारितोषिक एकांकिका वा व्यक्तिचित्र संग्रहास दिले जाते. यावर्षी आनंद अंतरकर यांच्या 'रत्नकीळ' या व्यक्तिचित्र संग्रहास हे पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध लेखक प्रा. द. मा. मिरासदार होते. परीक्षकांच्या वतीने शीला निपुणगे यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. मिरदेव गायकवाड यांनी आभार मानले.

## पु, भा. भावे स्मृतिदिन

**२६ ऑक्टोबर २००४**

पु. भा. भावे स्मृति-समिती व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने पु. भा. भावे यांच्या स्मरणार्थ एक कार्यक्रम घेण्यातं येतो. या कार्यक्रमात पु. भा. भावे स्मृति-समितीकडून, साहित्यसेवा व समाजसेवा या क्षेत्रांत महत्त्वपूर्ण कार्य केलेल्या व्यक्तींचा 'भावे पुरस्कार' देऊन गौरव करण्यात येतो. यावर्षी मंगळवार, दि. २६ ऑक्टोबर २००४ रोजी हा स्मृतिदिनाचा कार्यक्रम झाला. त्यासाठी सावंतवाडीचे प्रा. काशिनाथ वाडेकर हे वक्ते म्हणून निमंत्रित केले होते. त्यांनी 'सत्त्वशोधक पु. भा. भावे' या विषयावर प्रभावी भाषण केले. श्री. श्री. पु. गोखले यांनी अध्यक्षीय समारोपाचे भाषण केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक श्री. श्री. वि. सहस्रबुद्धे आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले. परिषदेचे प्रमुख कार्यवाह श्री. रवीन्द्र भट यांनी आभार प्रदर्शन केले.

**नंदा सुर्वे**
कार्यवाह.

**म. सा. परिषदेने प्रसिद्ध केलेला मराठी वाङ्मयाच्या इतिहाससंबंधीचा अभिमानास्पद व अपूर्व प्रकल्प**

## 'A History Of Modern Marathi Literature '

**Vol. I & II**

१९ वे व २० वे शतक या कालखंडातील मराठी वाङ्मयाचे समग्र, साधार व समतोल दर्शन घडविणारा ग्रंथ– दोन खंडांत

**संपादन समिती** : प्रा. ग. प्र. प्रधान, प्रा. के. ज पुरोहित,
प्रा. गो. म. कुलकर्णी, प्रा. के. रं. शिरवाडकर

**संपादक** : श्री. राजेन्द्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर

### पहिल्या खंडातील विषय व लेखक

१. साहित्याची सांस्कृतिक पार्श्वभूमी– डॉ. गं. ना. जोगळेकर
२. काव्य– प्राचार्य शिरीष चिंधडे
३. नाटक– डॉ. वि. भा. देशपांडे
४. कादंबरी– डॉ. निशिकांत मिरजकर
५. कथा– प्राचार्य के. ज. पुरोहित

### दुसऱ्या खंडातील विषय व लेखक

६. वैचारिक साहित्य– प्रा. ग. प्र. प्रधान
७. साहित्य समीक्षा, वाङ्मयेतिहास व संशोधन– प्रा. के. रं. शिरवाडकर
८. चरित्र, आत्मचरित्र, आठवणी– डॉ. सुरेश धायगुडे
९. ललित गद्य– प्राचार्य शिरीष चिंधडे
१०. इतिहासविषयक लेखन, संशोधन– डॉ. राजा दीक्षित
११. मराठी विनोदी साहित्य– प्राचार्य बाळ गाडगीळ
१२. संदर्भ साहित्य– डॉ. सु. रा. चुनेकर
१३. समारोप– डॉ. गं. ना. जोगळेकर

This History of Modern Marathi Literature in English, a uniqe project undertaken and completed by the Maharashtra Sahity Parishad Pune, is the result of a frequntly felt need mainly by the non-Marathi readers and scholars. Complete documentation, unbiased critical approach, and comprehensive treatment make this work invaluable.

दोन्ही खंडांची मिळून मूळ किंमत : रु १,०००/-

सवलतीचे मूल्य रु. ७००/- फक्त

Orignal Price for both the Volumes : Rs. 1000/-
Available at concessional price of Rs. 700/-
Please write to– Maharashtra Sahitya Parishad Tilak Road, Pune 411 030 India Telephone 020/24475963

अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Partrika Quarterly-April-June 2004 Registered with the Registrar of Newspapers for India Under N0, 6398/57

बुक पोस्ट

प्रती

प्रेषक : प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद** टिळक रस्ता, पुणे- ४११ ०३०.









